# भक्तिमार्गप्रदीप.



## १ प्रातःस्मरण.



उठा सकळ जन उठले नारायण । आनंदले मनिजन तिन्ही लोक ॥ १ ॥
जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ २ ॥
जोडोनियां कर मुख पहा सादर । पायांवरी शीर ठेवोनीयां ॥ ३ ॥
**तुका** म्हणे काय पढियंतें मागा । आपुलालें सांगा दुःख सकळ ॥ ४ ॥

### १ मंगलाचरण.

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीगुरुभ्यो नमः । श्रीवेदपुरुषाय नमः । इष्टदेवताभ्यो नमः । कुलदेवताभ्यो नमः । श्रीलक्ष्मीनारायणाभ्यां नमः । श्रीउमामहेश्वराभ्यां नमः । श्रीमातापितृभ्यो नमः ।

### करदर्शन व भूमिवंदन.

कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।
करमूले तु गोविंदः प्रभाते करदर्शनम् ॥ १ ॥
समुद्रवसने देवि ! पर्वतस्तनमंडले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥ २ ॥

### मुखमार्जनानंतर.

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥ ३ ॥
गणनाथसरस्वतीरविशुक्रबृहस्पतीन् ।
पंचैतान्संस्मरेन्नित्यं वेदवाणीप्रवृत्तये ॥ ४ ॥

गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः ।
गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ५ ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ ६ ॥
शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम् ।
लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं
वंदे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥ ७ ॥
मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥ ८ ॥
हे जिह्वे रससारज्ञे सर्वदा मधुरप्रिये ।
नारायणाख्यपीयूषं पिब जिव्हे निरंतरम् ॥ ९ ॥
पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ।
पुण्यश्लोको विदेहश्च पुण्यश्लोको जनार्दनः ॥ १० ॥
कर्कोटकस्य नागस्य दमयन्त्या नलस्य च ।
ऋतुपर्णस्य राजर्षे कीर्तनं कलिनाशनम् ॥ ११ ॥
अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च बिभीषणः ।
कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥ १२ ॥
बलिर्बिभीषणो भीष्मः प्रल्हादो नारदो ध्रुवः ।
षडैते वैष्णवास्तेषां स्मरणं पापनाशनम् ॥ १३ ॥
अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा ।
पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥ १४ ॥
अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः ॥ १५ ॥

गांगं वारि मनोहारि मुरारिचरणच्युतम् ।
त्रिपुरारिशिरश्चारि पापहारि पुनातु माम् ।। १६ ।।
जिह्वे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं
पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वयं त्वं शृणु ।
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालय
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीं मूर्धन्नमाधोक्षजम् ।। १७ ।।
पृथ्वी सगंधा सरसास्तथापः स्पर्शी च वायुर्ज्वलनः सतेजाः ।
नभः सशब्दं महता सहैते कुर्वंतु सर्वे मम सुप्रभातम् ।।१८।।
ब्रह्मा मुरारिस्त्रिपुरांतकारी भानुः शशी भूमिसुतो बुधश्च ।
गुरुश्च शुक्रः शनिराहुकेतवः कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम् ।।१९।।
जले रक्षतु वाराहः स्थले रक्षतु वामनः ।
अटव्यां नारसिंहश्च सर्वतः पातु केशवः ।। २० ।।
लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः ।
येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः ।। २१ ।।
सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषां त्वमंगलम् ।
येषां हृदिस्थो भगवान् मंगलायतनं हरिः ।। २२ ।।
न वासुदेवभक्तानामशुभं विद्यते क्वचित् ।
जन्ममृत्युजराव्याधिर्भयं नैवोपजायते ।। २३ ।।
आदौ रामतपोवनाधिगमनं हत्वा मृगं कांचनम्
वैदेहीहरणं जटायुमरणं सुग्रीवसंभाषणम् ।
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लंकापुरीदाहनम्
पश्चाद्रावणकुंभकर्णहननमेतद्धि **रामायणम्** ।। २४ ।।
आदौ देवकिदेविगर्भजननं गोपीगृहे वर्धनम्
मायापूतनजीवितापहरणं गोवर्धनोद्धारणम् ।
कंसच्छेदनकौरवादिहननं कौन्तेयसत्पालनं
एतद्भागवतं पुराणकथितं **श्रीकृष्णलीलामृतम्** ।। २५ ।।

श्रीरामा पुरुषोत्तमा नरहरी नारायणा केशवा
गोविंदा गरुडध्वजा गुणनिधे दामोदरा माधवा ।
श्रीकृष्णा कमलापते यदुपते सीतापते श्रीपते
वैकुंठाधिपते चराचरपते लक्ष्मीपते पाहि माम् ॥ २६ ॥
रामाय रामभद्राय रामचंद्राय वेधसे ।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥ २७ ॥
उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद उत्तिष्ठ गरुडध्वज ।
उत्तिष्ठ कमलाकांत उत्तिष्ठ मंगलं कुरु ॥ २८ ॥
नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च ।
जगद्धिताय कृष्णाय गोविंदाय नमो नमः ॥ २९ ॥
कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने ।
प्रणतक्लेशनाशाय गोविंदाय नमो नमः ॥ ३० ॥
वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥ ३१ ॥
मंगलं भगवान्विष्णुर्मंगलं गरुडध्वजः ।
मंगलं पुंडरीकाक्षो मंगलायतनं हरिः ॥ ३२ ॥

## २ भूपाळ्या.

### १ भूपाळी गणपतीची.

उठा उठा हो सकळिक वाचे स्मरावा गजमुख ।
ऋद्धिसिद्धींचा नायक सुखदायक भक्तांसी ।सु०दासांसी॥ध्रु०॥
अंगीं शेंदुराची उटी, माथां शोभतसे कीरिटी ।
केशरकस्तूरी लल्लाटीं, कंठीं हार साजिरा ॥ १ ॥
कानीं कुंडलांची प्रभा, चंद्रसूर्य जैसी नभा ।
मौंजी नागबंदी शोभा, स्मरतां उभा जवळी तो ॥ २ ॥

---

१ कटीचे ठायीं जसें 'मौंजीं वेष्टित वल्कलें'–आनंदतनय. २ नागाकृति कटिभूषण.

कांसे पितांबराची[1] धटी, हातीं मोदकाची वाटी ।
**रामानंद** स्मरतां कंठीं, तो संकटीं पावतो ॥ ३ ॥

## २ भूपाळी रामाची.

उठोनियां प्रातःकाळीं । जपा रामनामावळी ।
स्वयें ध्यातो चंद्रमौळी[2] । शैलबाळीसमवेत[3] ॥ ध्रु० ॥
राम योग्यांचें मंडन । राम भक्तांचें भूषण ।
राम धर्माचें रक्षण । संरक्षण दासाचें ॥ १ ॥
रामें ताटिका मारिली । रामें शिळा उद्धरिली ।
रामें जानकी पर्णिली । गणिका केली ते मुक्त ॥ २ ॥
रामें पाषाण तारिले । रामें दैत्य संहारिले ।
रामें बंदी सोडविले । मुक्त केले सुरवर ॥ ३ ॥
रामें रक्षिलें भक्तांसी । रामें सोडविलें देवांसी ।
राम दासाचे मानसीं । **रामदासीं** आनंद ॥ ४ ॥

## ३ प्रभाती रामाची.

जागिये रघुनाथकुंवर । पक्षी बन बोले ॥ टेक ॥
चंद्रकिरण शीतल भई[4] । चकई[5] पियमिलन[6] गई ।
त्रिविध मंद चलत पवन । पल्लव द्रुम डोले ॥ १ ॥
प्रातभानु प्रकट भयो । रजनीको तिमिर गयो ।
भृंग करत गुंजगान । कमलवदन खोले[7] ॥ २ ॥
ब्रह्मादिक धरत ध्यान । सुरनरमुनि करत गान ।
जागनकी बेर[8] भई । नयनपलक खोले ॥ ३ ॥
**तुलसिदास** अतिअनंद । निरखि कै मुखारविंद ।
दीननको देत दान । भूषण बहु मोले ॥ ४ ॥

---

१ रेशमी वस्त्र. २ शंकर. ३ पार्वतीसह. ४ झाले. ५ चक्रवाकी. ६ प्रियाशीं संगत. ७ उघडा. ८ वेळ.

### ४ भूपाळी पंढरीची.

उठा उठा हो वेगेंसी । चला जाऊं पंढरीसी ।
भेटों विठ्ठलरखुमाईसी । त्रिविधताप हरतील ॥ ध्रु० ॥
चंद्रभागे करूं स्नान । घेऊं पुंडलिकाचें दर्शन ।
तेथें भेटति संतजन । तेणें मन निवेल ॥ १ ॥
गंगा यमुना सरस्वती । कृष्णा वेण्या भागीरथी ।
तुंगभद्रा भोगावती । येती श्रीपातिदर्शना ॥ २ ॥
तापी नर्मदा कावेरी । पंचगंगा गोदावरी ।
स्नानें केलिया बोहरी[1] । महादोष हरतील ॥ ३ ॥
**रामानंदाचें** माहेर । क्षेत्र नाम पंढरपूर ।
माता पिता विश्वंभर । पैलपार तरतील ॥ ४ ॥

### ५ भूपाळी कृष्णाची.

जाग रे जाग बापा ! विश्वपालका कृष्णा ! ।
दीन आम्ही उभे द्वारीं, आमची बोळवी[2] तृष्णा ॥ ध्रु० ॥
त्रासलों प्रपंचीं या, बहु कष्टलों भारी ।
म्हणउनि शरण आलों विभो ! तुझिया द्वारीं ॥ जाग० ॥१॥
सांग बा ! न्यून काय हरि ! तुझिया भांडारीं ।
याचक भीक मागे प्रेम देई[3] झडकरी ॥ २ ॥
गुरुकृपे उदयो झाला हरि उदया आला ।
सुख तें काय सांगूं जिवलग भेटला ॥ जाग० ॥ ३ ॥
श्रीगुरुनाथराय कृपासिंधु गोविंदा ।
**देवनाथ** प्रार्थिताहे प्रभुपदारविंदा ॥ जाग० ॥ ४ ॥

### ६ भूपाळी श्रीकृष्णाची

ऊठ गोपाळजी ! जाय धेनूंकडे । पाहती सौंगडे[4] वाट तूझी ॥ ध्रु० ॥
लोपली हे निशी मंद झाला शशी । मुनिजन मानसीं ध्याति तुजला ॥ १ ॥

---

१ जोडप्यानें, ओहरानें. २ दवडी. ३ प्रेमाची भिक्षा घाल. ४ खेळगडी.

भानु उदयाचळीं तेज पुंजाळलें । विकसती कमळें जळामाजी ॥ २ ॥
धेनुवत्सें तुला बोहती माधवा । ऊठं गा यादवा ! उशिर झाला ॥ ३ ॥
ऊठ पुरुषोत्तमा ! वाट पाहे रमा ! दावि मुखचंद्रमा सकाळिकांसी ॥ ४ ॥
कनकपत्रांतरीं दीपरत्नें बरीं । ओवाळिती सुंदरी तूजलागीं ॥ ५ ॥
जन्मजन्मांतरीं दास होऊं हरी । बोलती वैखरी भक्त तूझे ॥ ६ ॥
कृष्णकेशव करीं चरणांबुज धरी । ऊठ गा श्रीहरी मायबापा ॥ ७ ॥

## ७ भूपाळी संतांची.

उठि उठि बा पुरुषोत्तमा । भक्तकामकल्पद्रुमा ।
आत्मारामा निजसुखधामा । मेघश्यामा श्रीकृष्णा ॥ ध्रु० ॥
भक्तमंडळी महाद्वारीं । उभी तिष्ठत श्रीहरी ।
जोडोनियां दोन्ही करीं । तुज मुरारी प्रहावया ॥ १ ॥
संत सनकादिक नारद । व्यास वाल्मिक ध्रुव प्रऱ्हाद ।
पार्थ पराशर रुक्मांगद । हनुमान अंगद बाळिराजा ॥ २ ॥
झाला प्रातःकाळ पूर्ण । करीं पंचांगश्रवण ।
आला मुद्गलभट ब्राह्मण । आशीर्वचन घे त्याचें ॥ ३ ॥
तुझा नामदेव शिंपी । घेउनि आला आंगीटोपी ।
आतां जाऊं नको बा झोंपीं । दर्शन देईं निजभक्तां ॥ ४ ॥
नानापरीचे अळंकार । घेउनि आला नरहरिसोनार ।
आला रोहिदास चांभार । जोडा घेउनि तुजलागीं ॥ ५ ॥
सुगंधसुमनें पुष्पांजुळी । घेउनि आला सांवतामाळी ।
म्हणे श्रीहरिपदकमळीं । अनन्यभावें समर्पू ॥ ६ ॥
कान्हूपात्रा नृत्य करी । टाळछंदें साक्षात्कारी ।
सेना न्हावी दर्पण करीं । घेउनि उभा राहिला ॥ ७ ॥
लिंबुर हुरडा घेउनि आला । तो हा माणकोजी बोधला ।
दर्शन द्यावें बा ! त्याजला । भक्त भोळा म्हणऊनी ॥ ८ ॥

---

१ बोलवितात. २ बाजरीच्या कणसांचा हुरडा. ३ जोंधळ्याचा हुरडा.

मिराबाई तुझेसाठीं । दूध–तुपें भरुनी वाटी ।
तुझे लावावया ओंठीं । लक्ष लाउनि बैसली ॥ ९ ॥
नामदेवाची जनी दासी । घेउनि आली तेलतुपासी ।
तुज न्हाऊं घालण्यासी । उभी ठेली महाद्वारीं ॥ १० ॥
गुळखोबरें भरुनी गोणी । घेउनि आला तुकयावाणी ।
वह्या राखिल्या कोरड्या पाणीं । भिजों दिल्या नाहीं त्वां ॥ ११ ॥
आला चोखामेळा महार । स्वामी करीतसे जोहार ।
त्याचा करोनियां उद्धार । संतमेळीं स्थापिला ॥ १२ ॥
हरिभजनाविण वायां गेले । ते नरदेहीं बैल झाले ।
गोऱ्याकुंभारें आणिले । खेळावया तुजलागीं ! ॥ १३ ॥
गरुडपारीं हरिरंगणीं । टाळमृदंगाचा ध्वनी ।
महाद्वारीं हरिकीर्तनीं । तल्लिन कान्हा हरिदास ॥ १४ ॥
निजानंदें रंगे पूर्ण । सर्वहि कर्मे कृष्णार्पण ।
श्रीरंगा निजतनु अर्पण । चरणसेवा करीतसे ॥ १५ ॥

## ८ भूपाळी गंगेची.

उठोनियां प्रातःकाळीं । वदनीं वदा चंद्रमौळी[1] ।
श्रीबिंदुमाधवाजवळी । स्नान करा गंगेचें । स्नान करा गोदेचें ॥ ध्रु० ॥
स्नानदान जया अंतरीं । घडेल भागिरथीच्या तीरीं ।
हरि कृपा करिल त्यावरी । ऐसें माहात्म्य गंगेचें ( गोदेचें[2] ) ॥ १ ॥
भागिरथिचें स्नान करा । हृदयीं स्मरोनि गंगाधरा ।
चुकेल चौऱ्यायशींचा फेरा । ऐसें माहात्म्य गंगेचें ॥ २ ॥
गंगा आहे स्वर्गावरतीं । पाताळीं ते भोगावती ।
मृत्युलोकीं हे विख्याती । ऐसें माहात्म्य गंगेचें[3] ॥ ३ ॥
कृष्णा वेण्या तुंगभद्रा । शरयू कालिंदी नर्मदा ।
भीमा भामा मुख्य गोदा । करा स्नान गंगेचें ॥ ४ ॥

---

१ शंकर. २ गोदावरी हीही दक्षिणेंतली गंगाच आहे. ३ म्हणूनच तिला 'त्रिपथगा' म्हणतात.

व्यास वाल्मीकि नारदमुनी । अत्री वसिष्ठ आणि जैमिनी ।
गुरु दत्त येति माध्यान्हीं । ऐसें माहात्म्य गंगेचें ॥ ५ ॥
आली आषाढिएकादशी । चला जाऊं पंढरिसी ।
पांडुरंगचरणापाशीं । दावी माहात्म्य गंगेचें ॥ ६ ॥

### ९ भूपाळी घनश्याम श्रीधराची.

घनश्यामसुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठिं लवकरि वनमाळी ! उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥
सायंकाळीं एके वेळीं द्विजगण अवघे वृक्षीं ।
अरुणोदय होतांचि उडाले चरावया पक्षी ॥
अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरण—दक्षी ।
प्रभातकाळीं उठुनि कौंपडी तीर्थपंथ लक्षी ॥
करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं ।
यमुनाजळासि जाति मुकुंदा ! दध्योदन भक्षीं ॥
मुक्तता होऊं पाहे । कमळिणीपासुनीयां भ्रमरा ।
पूर्वदिशे मुख धुतलें । होतसे नाश तिमिरा ॥
उठिं लवकरि गोविंदा सांवळ्या नंदकुमरा ।
मुखप्रक्षालन करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ १ ॥
घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती ।
गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥
प्रवर्तोनि गृहकामीं रंगावाळे घालूं पाहती ।
आनंदकंदा ! प्रभात झाली उठ सरली राती ॥
काढीं धार क्षीरपात्रीं घेउनी धेनू हंबरती ।
द्वारीं उभे गोपाळ तुजला हांक मारुनि बाहती ॥
हे सुमनहार कंठीं । घालिं या गुंजमाळा ।
हातीं वेत्रकाष्ठ बरवें । कांबळा घेइं काळा ॥

---

१ तीर्थें व संतऋषिमुनी यांचें नित्य साहचर्य आहे. २ पापनाशक स्तोत्रें म्हणणें वगैरे. ३ यात्रेकरू. ४ दहींपोहे.

ममात्मजा मधुसूदना हृषीकेशि जगत्पाळा ।
हंबरताति वासरें, धेनु स्तन–पान्हा आला ॥ २ ॥
प्रातःस्नानें करुनि गोपिका अलंकारें नटती ।
कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभीती ॥
प्रेमभरित अंतरांत वदनीं नामावळि गाती ।
अर्घ्यदान देउनियां द्विजजन देवार्चन करिती ॥
नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णु–पूजा समर्पिती ।
स्मार्त शिवार्चनसक्त, शक्तितें शाक्त आराधीती ॥
ऋषिगण आश्रमवासी । जे निरंजनीं घाले ।
अरुणोदय होतांचि । आपुले ध्यानीं मग्न झाले ॥
पंचपंच–उषःकालीं । रविचक्र निघों आलें ।
एवढा वेळ निजलासि म्हणुनि हरि कळेल नंदाला ॥ ३ ॥
विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ।
अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं ॥
याज्ञिकजन यज्ञकुंडिं आहुती टाकिताति पाहीं ।
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥
हे माझे सांवळे पाडसे । उठिं कृष्णाबाई ।
सिद्ध सर्वे बाळिराम घेउनी गोधनें वना जाई ॥
मुनिजनमानसहंसा । गोपीमनःकमलभृंगा ।
मुरहर पंकजपाणी । पद्मनाभ श्रीरंगा ।
शकटांतक सर्वेशा । हे हरि प्रतापतुंगा ।
कोटिरवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ।
**होनाजी–बाळा** नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ॥ ४ ॥

## १० भूपाळी आत्मारामाची.

उठा प्रातःकाळ झाला । आत्माराम पाहूं चला ।
हा समयो जरि टळला । तरि अंतरला श्रीराम ॥ ध्रु० ॥

---

१ सदर अप्रतिम भूपाळी रचणारा पुरुष एक नाहीं. ती **होनाजी** गवळी व **बाळा** शिंपी या दोघांच्या संयुक्त नांवावर आहे.

जीवाशिव दोघेजण । भरत आणि शत्रुघन ।
आला बंधु लक्ष्मण । मन उन्मन होउनी ॥ १ ॥
विवेक वसिष्ठ सद्गुरू । संतसज्जन मुनीश्वरू ।
करिती नामाचा गजरू । हर्षनिर्भर होउनियां ॥ २ ॥
सात्विक सुमंत प्रधान । नगरवासी अवघे जन ।
आला वायूचा नंदन । श्रीचरण पहावया ॥ ३ ॥
माता जानकी विघडली[१] । होती प्रारब्धें लिहिली ।
तिची देहबुद्धि जाळिली । आलिंगिली श्रीरामें ॥ ४ ॥
आजचि दिवाळी दसरा । पर्वकाळ आला घरा ।
रामानंदाच्या दातारा । भेटी माहेरा मज यावी ॥ ५ ॥

## ११ भूपाळी गोपाळाची.

उठिंरे गोपाळा[२] । उघडीं स्वरूपलोचना । सरलि अविद्याराती उदयो आला रविकिरणा ॥ इंद्रियोधनें[३] नेईं निर्गुणकानना । सुटलीं मानसवत्सें[४] तुजविण नाकळती कोणा ॥ ध्रु० ॥

प्रबोधपहांट झाली सरले तिमिर–तम–रज । गुरुकृपेचा अरुण दावी सुरंगसम तेज ॥ आत्मादिनकर पाठीं प्रगटे तात्काळिक सहज । जिवचंद्राचें मंडळ तेणें झालें निस्तेज ॥ १ ॥

दृश्यभास–चांदणिया असते ठायिंच लोपलिया । लिंगदेहकमळींचे मधुकर सुटले आपसया ॥ बुद्धिबोधचक्रवाकें मिनलीं आपणियां । देहबुद्धिकुमुदिनी सुकोनि गेलीसे विलया ॥ २ ॥

योगाविद्येच्या पंथें साधकवृंदें चालियलीं । उपनिषद्भागार्थ शब्द केला

१ दूषिली. रावणगृहीं राहिल्यामुळें अग्नींत दिव्य झाल्यावर म्ह० देहबुद्धि नष्ट झाल्यावर रामानें सीतेला आलिंगिलें. २ इंद्रियचालका ! ३ इंद्रिय हीं ओढाळ गुरें. ४ विषयेंद्रियसंयोगानें पुष्ट होणारीं मानसरूपी वांसरें. ५ हें मुक्तेश्वरी रूपक बहारीचें आहे. गुरुकृपेचा अरुणोदय झाला कीं आत्मस्वरूपसूर्याचा प्रकाश मागून आलाच; मी ब्रह्म आहें हा अनुभव होतांच जीवपण मावळतें.

कोकिळीं ॥ वाग्वादाचे उलूक निघती मौनाचे ढोलीं । विकल्पअटवी साहीं चोरीं सांडियली ।। ३ ॥

विरागरश्मीजवळी धरितां चित्तरविकांत । आत्मवन्हि प्रगटे विषयवन हें जाळीत ॥ तृष्णेच्या श्वापदावरी प्रळय अद्भुत । विश्व हें लटिकें मूढा मृगजळवत ॥ ४ ॥

जारव्यसनीं जीव हा झाला उद्‌मी सुविचार । वासनाकुंटिणिचा सहजें खुंटला व्यापार ॥ लीळाविश्वंभरस्वामी उठिला सत्वर । चाले मुक्तेश्वर संगीं धरूनियां कर ॥ ५ ॥

## १२ वेदांतपर भूपाळीपंचक.

[ ह्या भूपाळींत वेदांताचें रहस्य उत्कृष्ट प्रकारें स्वल्पांत आणलें आहे. जीव आणि शिव हे अनुक्रमें स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण आणि विराट्, हिरण्यगर्भ, महत्तत्त्व व मूळमाया ह्या उपाधिभूत देहांहून निराळे आहेत हें सांगून अष्टदेहांचें निरसन पहिल्या कडव्यांत केलें आहे. दुसऱ्यांत देहधर्म, प्राणधर्म व मनोधर्म ह्यांहून जीवाचें असंगत्व दाखवून ‘ सकळ सच्चिदानंद ’ हें अन्वयव्यतिरेकानें सिद्ध केलें आहे. तिसऱ्यांत विरक्ति, भक्ति व ज्ञान ह्यांचीं लक्षणें सांगून ह्या त्रिवेणीसंगमांत नित्य स्नान करणारा पुरुष वर्णाश्रमधर्मापासूनही कसा मुक्त होतो हें वर्णिलें आहे. चवथ्यांत वृत्तिसाक्षित्व अनुभवून सहजसमाधि कशी साधावी तें सांगितलें आहे, व पांचव्यांत विसर ( अज्ञान ) विसरून आठव ( ज्ञान ) ग्रासून ब्रह्मरूप होऊन गुर्वाज्ञापालन करीत देहपात होईपर्यंत कसें रहावें तें सांगितलें आहे. ]

रामकृष्ण हरि गोविंदा राजिवनयनारे । बापा राजारामारे ।
अनाथबंधो पतितपावना करुणावंतारे ॥ ध्रु० ॥
गुरुकरुणोदयकाळीं शिव गुरुवर गीतीं गावा ।
स्वहिताकारणें आपुला आपणचि विचार करावा ॥ १ ॥
इंद्रियांसकट स्थूळ नव्हे मी जाणता त्याचा ।
याचें कारण विराट नोहे मी देखणा साचा ॥ २ ॥

---

१ उपनिषदांनीं गायिलेल्या आत्मस्वरूपाचा बोध होतांच वाग्वादरूपी दिवाभीतें सहजच पळून जातात, अर्थात् वाचा-निवृत्ति होते. २ मी केवळ द्रष्टा आहें.

मनबुद्धी दों वृत्तिसिं जाणे अंतःकरणाच्या ।
कारण हिरण्यगर्भ तयाचा साक्षी मी साचा ॥ ३ ॥
स्वरूपीं जे कां विस्मृति तें मायेचें रूप जाणा ।
तें [illegible] येथें कारण मीच जाणे आपणा ॥ ४ ॥
तनुत्रयाचा साक्षी तो मी महाकारण ।
तेथिल चौथे महामायेसि मीच ओळखण ॥ ५ ॥
शबल द्वय–उपाधि निरसिता जीवशिवपण हरलें ।
शुद्ध पूर्णानंदीं रिघतां शिवरामाचि झालें ॥ ६ ॥

२

मी देह नव्हेसा झालों तेव्हां ‘ उपजणें–निमणें ।
रोड–मोठा वृद्ध–तरुण ’ हें कांहींच मी नेणें ॥ १ ॥
यापरि विचार करितां मनुजा सुमनें साक्षेपें ।
चैतन्य आत्मा मी हें कळतां विचारही लोपे ॥ २ ॥
मनसह अंतःकरणाचा परि देखणाचि वेगळा ।
वर्णाश्रम सुखदुःखें येउनि बाधिति कवणाला ? ॥ ३ ॥
क्षुधातृषादि प्राणधर्म हे मजला दिसताती ।
मज मी फिरोनि पाहतां मग हे कवणा बाधीती ॥ ४ ॥
हें जड ऐसें जाणुनि निराळा होउनि पाहतां ।
व्यतिरेकेंची चिदचिद्ग्रंथी सुटे तत्त्वतां ॥ ५ ॥
सकळ सच्चिदानंदु हा हो अन्वयाचा बोधु ।
तो जाणावा शिवरामाचा परिपूर्णानंदु ॥ ६ ॥

३

विषय इंद्रियें जड ओळखणें तेची विरक्ती ।
चैतन्याकडे वृत्ति फिरविणें या नांवें भक्ती ॥ १ ॥

---

१ स्वरूपाची विस्मृति हीच माया. २ चित् व जड यांची गांठ. ३ वृत्ति चैतन्याकडे ‘फिरविणें ही भक्ति व ‘ चिद्घन परमात्मा आहे ’ असा अनुभव हें ज्ञान.

मी चिद्घन वस्तुची प्रतीती शुद्ध तें ज्ञान ।
यापरि त्रिवेणीचें नित्य करावें स्नान ॥ २ ॥
वर्णाश्रमसह युक्ताचारचि इंद्रियां घडे ।
विरक्ति भक्ति ज्ञान हातां आपेआप चढे ॥ ३ ॥
मुळिचा विचार हरपे हर्षामर्ष मग कैंचे ।
**शिवराम** भजे पाय पूर्णानंदाचे ॥ ४ ॥

## ४

वृत्ती जिकडे धांवे तिकडे न जावें तीपाठीं ।
तिचा साक्षी[1] होउनि पाहतां स्वरुपिं सदा भेटी ॥ १ ॥
वृत्तिकडे पाहतां वृत्ती आपणांताचि मुरे ।
आपण चैतन्य मात्र केवळ परिपूर्ण उरे ॥ २ ॥
मग देखे ऐके स्पर्शे हुंगे जो जो रसें चाखे ।
बोले चाले वेव्हारीतां आपआपणां देखे ॥ ३ ॥
सहजसमाधी सहजाचि भोगी पूर्णानंदू रे ।
**शिवराम** निरावरण होउनी आनंदें वावरे ॥ ४ ॥

## ५

अरुणोदयकाळीं म्हणतां पदें पांच हीं ।
अर्थी विवरुनि पाहतां होई देहीं विदेही ॥ १ ॥
सद्गुरु—आज्ञावचन पाळणें या नांवें ।
वेव्हारीतां आपण आपणां विसरूं न द्यावें ॥ २ ॥
विसरा विसरुनि आठवा ग्रासुनि आत्मा स्वयें होणें ।
होणें न होणें वृत्तीविण तें अंगीं अनुभवणें ॥ ३ ॥
जगीं आपण भरला आपणामाजी जग पाहे ।
तो जाणावा **शिवरामाचा** पूर्णानंदु आहे ॥ ४ ॥

---

१ आपण साक्षी—देखणा होऊन वृत्तीकडे पाहूं लागला कीं वृत्ति चोरासारखी पळून जाते. २ शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचविषय.

# ३ हरिपाठाचे अभंग.

१

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥
हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा । पुण्याची गणना कोण करी ? ॥ २ ॥
असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥
ज्ञानदेव म्हणे व्यासाचिये खुणें । द्वारकेचे राणे पांडवाघरीं ! ॥ ४ ॥

२

संतांचे संगतीं मनोमार्गें गती । आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ १ ॥
रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा । आत्मा जो शिवाचा राम जप ॥ २ ॥
एकतत्त्वनाम साधिती साधन । द्वैताचें बंधन न बाधिजे ॥ ३ ॥
नामामृतगोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवनकळा ॥ ४ ॥
सत्वर उच्चार प्रऱ्हादीं बिंबला । उद्धवा लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥
ज्ञानदेव म्हणे नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥

३

जपतपकर्मक्रियानेमधर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥ १ ॥
न सोडीं रे भावो टाकीं रे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडीं ॥ २ ॥
जातवित्तगोत कुळशीळमात । भजें कां त्वरित भावनायुक्त ॥ ३ ॥
ज्ञानदेव ध्यानीं रामकृष्ण मनीं । तेणें वैकुंठभुवनीं घर केलें ॥ ४ ॥

४

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥
रामकृष्णनाम सर्वां दोषां हरण । जडजीवां तारण हरि एक ॥ २ ॥

---

१ धर्म. २ शिवाचा आत्मा जो राम तो जप. ३ अद्वितीय असा जो एक परमात्मा त्याचें नामस्मरण हेंच परम साधन साधितात. ४ सतरावी जीवनकळा. ५ हरिनाम सोपें असून कोणी घेत नाहीं म्हणून दुर्लभ झालें आहे. ६ जपतपादि सर्व साधनांत सर्वांभूतीं भगवंत पाहणें हें मुख्य आहे. ७ जातिवित्तादि गोष्टी गौण आहेत; श्रद्धेनें हरीला भजणें हें मुख्य पाहिजे आहे. ८ आईचा पक्ष व बापाचा पक्ष; किंवा नाम घेणारा व ऐकणारा.

हरिनाम सार, जिव्हा[१] या नामाची ! उपमा त्या दैवाची कोण वानी ॥३॥
**ज्ञानदेवा** सांगा झाला नामपाठ । पूर्वजां वैकुंठमार्ग सोपा ॥ ४ ॥

५

हरीचिया दासा हरी दाही दिशा । भावें जैसा तैसा हरी एक ॥ १ ॥
हरी मुखीं गातां हारपली चिंता । त्या नाहीं मागुता जन्म घेणें ॥ २ ॥
जन्म घेणें लागे वासनेच्या संगें । तेचि झाली अंगें हरिरूप ॥ ३ ॥
हरिरूप झालें जाणणें हरपलें । नेणणें तें गेलें हरिचे ठायीं ॥ ४ ॥
हरिरूप ध्यानीं हरिरूप मनीं । **एका जनार्दनीं** हरि बोला ॥ ५ ॥

६

हरि बोला देतां हरि बोला घेतां । हांसतां खेळतां हरि बोला ॥ १ ॥
हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ॥ २ ॥
हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं । देह त्यागितां अंतीं हरि बोला ॥३॥
हरि बोला भांडतां हरि बोला कांडतां । उठतां बैसतां हरि बोला ॥ ४ ॥
हरि बोला जनीं हरि बोला विजनीं । **एका जनार्दनीं** हरि बोला ॥ ५ ॥

७

पिंडीं देहस्थिति ब्रह्मांडीं पसारा । हरीवीण सारा व्यर्थ भ्रम ॥ १ ॥
शुक याज्ञवल्क्य दत्त कपिलमुनी । हरिसी जाणोनि हरिच झाले ॥ २ ॥
यारे यारे धरूं हरिनामतारूं । भवाचा सागरू भय नाहीं ॥ ३ ॥
साधुसंत गेले आनंदीं राहिले । हरिनामें झाले कृतकृत्य ॥ ४ ॥
**एका जनार्दनीं** मांडिलें दुकान । देतो मोलेंवीण सर्व '**वस्तु**' ॥ ५ ॥

८

आवडीनें भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥ १ ॥
नको खेद करूं कोणत्या गोष्टीचा । पती लक्ष्मीचा जाणतसे ॥ २ ॥
सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥
जैसी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥ ४ ॥
**एका जनार्दनीं** भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश आहे ॥ ५ ॥

---

१ ज्यानें आपली जिव्हा नामाकडे योजिली त्याचें भाग्य कोण वाखाणील !

९

यमुना कावेरी गंगा भागीरथी । कृष्णा सरस्वती तुंगभद्रा ॥ १ ॥
नर्मदा आठवी वेळोवेळां वाचे । नाहीं भय साचे प्राणियांसीं ॥ २ ॥
तयांचे संगतीं पापी उद्धरती । दर्शनेंचि होती मुक्ति प्राप्त ॥ ३ ॥
तुका म्हणे नामीं एकनिष्ठभाव । तेथें वासुदेव सर्वकाळ ॥ ४ ॥

१०

प्रातःकाळीं नाम पवित्राचि घ्यावें । तेणें विसरावें जन्ममृत्यु ॥ १ ॥
नळ युधिष्ठिर जनक जनार्दन । स्मरणेंचि धन्य होती प्राणी ॥ २ ॥
न करा आळस नाम घेतां वाचे । नाहीं भय साचे प्राणियांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे वाचें गाईल गोविंद । होय परमानंद नामें एका ॥ ४ ॥

११

आवडे हें रूप साजिरें सगुण । पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥
आतां दृष्टीपुढें असाचि तूं राहे । जों मी तुज पाहें नारायणा ॥ २ ॥
लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवभावें न सोडी ऐसें झालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं मागावें लडिवाळी । पुरवावीं आळी पांडुरंगा ॥ ४ ॥

१२

समाधान चित्ताचें चरणआलिंगन । पायांवरी मन स्थिरावलें ॥ १ ॥
जैसें केलें तैसें घालूं लोटांगणा । करूं प्रदक्षिणा नमस्कार ॥ २ ॥

---

१. " पुण्यश्लोको **नलो** राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोको विदेहश्च पुण्यश्लोको जनार्दनः " असा शुद्ध श्लोक आहे. ' पुण्यश्लोका च वैदेही ' असा पाठ फार प्रचलित आहे. पण तुकोबांचा पाठ तरी सीतावाचक नसून जनक-वाचकच होता असे स्पष्ट दिसतें. त्याचप्रमाणें ' अहल्या द्रौपदी सीता तारा मन्दोदरी तथा । पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ' हा श्लोक शुद्ध असून लोक ' पंचकन्याः स्मरेन्नित्यं ' असें म्हणतात, तीहि चूक आहे. महापातकनाशनं ह्या विशेषणाचें विशेष्य पंचकं हेंच शोभतें, हें मुलांसहि सहज कळणारें आहे. तेथें ' ना ' म्हणजे ' नरः ' असा अर्थ आहे.

प्रार्थितों मी तुज राहे माझ्या पोटीं । हृदयसंपुटीं देवराया ॥ ३ ॥
क्षेमआलिंगन दिली पायीं मिठी । सांडलीसे लुटी अमूप हो ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां आनंदीआनंद । गाऊं परमानंद मनासंगें ॥ ५ ॥

---

## ४ चर्पटपंजरिकास्तोत्रम्.

दिनमपि रजनी सायंप्रातः शिशिरवसंतौ पुनरायातः ।
कालः क्रीडति गच्छत्यायुस्तदपि न मुंच्यत्याशावायुः ॥ १ ॥
भज गोविंदं भज गोविंदं भज गोपालं मूढमते ।
प्राप्ते सन्निहिते मरणे नहिनाहि रक्षति डुकृञ्करणे ॥ ध्रु० ॥
अग्रे वह्निः पृष्ठे भानू रात्रौ चुबुकसमर्पितजानुः ।
करतलभिक्षा तरुतलवासस्तदपि न मुंचत्याशापाशः ॥ २ ॥
यावद्वित्तोपार्जनसक्तस्तावन्निजपरिवारो रक्तः ।
पश्चाद्धावति जर्जरदेहे वार्तां पृच्छति कोऽपि न गेहे ॥ ३ ॥
जटिलो मुंडी लुंचितकेशः काषायांबरबहुकृतवेषः ।
पश्यन्नपि च न पश्यति मूढ उदरनिमित्तं बहुकृतवेषः ॥ ४ ॥
भगवद्गीता किंचिदधीता गंगाजललवकणिका पीता ।
सकृदपि यस्य मुरारिसमर्चा तस्य यमः किं कुरुते चर्चाम् ॥ ५ ॥
अंगं गलितं पलितं मुंडं दशनविहीनं जातं तुंडम् ।
वृद्धो याति गृहीत्वा दंडं तदपि न मुंचत्याशापिंडम् ॥ ६ ॥
बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्तः ।
वृद्धस्तावच्चिंतामग्नः परे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ ७ ॥
पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरे शयनम् ।
इह संसारे भवदुस्तारे कृपयाऽपारे पाहि मुरारे ॥ ८ ॥
पुनरपि रजनी पुनरपि दिवसः पुनरपि पक्षः पुनरपि मासः ।
पुनरप्ययनं पुनरपि वर्षं तदपि न मुंचत्याशामर्षम् ॥ ९ ॥

वयसि गते कः कामविकारः शुष्के नीरे कः कासारः ।
नष्टे द्रव्ये कः परिवारो ज्ञाते तत्त्वे कः संसारः ॥ १० ॥
नारीस्तनभरनाभिनिवेशं मिथ्यामायामोहावेशम् ।
एतन्मांसवसादिविकारं मनसि विचारय वारंवारम् ॥ ११ ॥
कस्त्वं कोऽहं कुत आयातः का मे जननी को मे तातः ।
इति परिभावय सर्वमसारं विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम् ॥ १२ ॥
गेयं गीतानामसहस्रं ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम् ।
नेयं सज्जनसंगे चित्तं देयं दीनजनाय च वित्तम् ॥ १३ ॥
यावज्जीवो निवसति देहे कुशलं तावत्पृच्छति गेहे ।
गतवति वायौ देहापाये भार्या बिभ्यति तस्मिन्काये ॥ १४ ॥
सुखतः क्रियते रामाभोगः पश्चाद्धंत शरीरे रोगः ।
यद्यपि लोके मरणं शरणं तदपि न मुंचति पापाचरणम् ॥ १५ ॥
रथ्याचर्पटविरचितकंथः पुण्यापुण्यविवर्जितपंथः ।
नाहं न त्वं नायं लोकस्तदपि किमर्थं क्रियते शोकः ॥ १६ ॥
कुरुते गंगासागरगमनं व्रतपरिपालनमथवा दानम् ।
ज्ञानविहीने सर्वमनेन मुक्तिर्न भवति जन्मशतेन ॥ १७ ॥
॥ इति श्रीशंकराचार्यविरचितं चर्पटपंजरिकास्तोत्रं संपूर्णम् ॥

## ५ द्वादशपंजरिकास्तोत्रम्.

मूढ जहीहि धनागमतृष्णां कुरु तनुबुद्धे ! मनसि वितृष्णाम् ।
यल्लभसे निजकर्मोपात्तं वित्तं तेन विनोदय चित्तम् ॥ १ ॥
अर्थमनर्थं भावय नित्यं नास्ति ततः सुखलेशः सत्यम् ।
पुत्रादपि धनभाजां भीतिः सर्वत्रैषा विहिता नीतिः ॥ २ ॥
का ते कांता कस्ते पुत्रस्संसारोऽयमतीव विचित्रः ।
कस्य त्वं कः कुत आयातस्तत्त्वं चिंतय यदिदं भ्रातः ॥ ३ ॥

मा कुरु जनधनयौवनगर्वं हरति निमेषात्कालः सर्वम् ।
मायामयमिदमखिलं हित्वा ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ॥ ४ ॥
कामं क्रोधं लोभं मोहं त्यक्त्वात्मानं भावय कोऽहम् ।
आत्मज्ञानविहीना मूढास्ते पच्यंते नरकनिगूढाः ॥ ५ ॥

सुरमंदिरतरुमूलनिवासः शय्या भूतलमजिनं वासः ॥
सर्वपरिग्रहभोगत्यागः कस्य सुखं न करोति विरागः ॥ ६ ॥
शत्रौ मित्रे पुत्रे बंधौ मा कुरु यत्नं विग्रहसंधौ ।
भव समचित्तः सर्वत्र त्वं वांच्छस्यचिराद्यदि विष्णुत्वम् ॥ ७ ॥
त्वयि मयि चान्यत्रैको विष्णुर्व्यर्थं कुप्यसि सर्वसहिष्णुः ।
सर्वस्मिन्नपि पश्यात्मानं सर्वत्रोत्सृज भेदाज्ञानम् ॥ ८ ॥

प्राणायामं प्रत्याहारं नित्यानित्यविवेकविचारम् ।
जाप्यसमेतसमाधिविधानं कुर्ववधानं महदवधानम् ॥ ९ ॥

नलिनीदलगतसलिलं तरलं तद्वज्जीवितमतिशयचपलम् ।
विद्धि व्याध्यभिमानग्रस्तं लोकं शोकहतं च समस्तम् ॥ १० ॥

का तेऽष्टादशदेशे चिंता वातुल तव किं नास्ति नियंता ? ।
यस्त्वां हस्ते सुदृढनिबद्धं बोधयति प्रभवादिविरुद्धम् ॥ ११ ॥

गुरुचरणांबुजनिर्भरभक्तः संसारादचिराद्भव मुक्तः ।
सेंद्रियमानसनियमादेवं द्रक्ष्यसि निजहृदयस्थं देवम् ॥ १२ ॥
द्वादशपंजरिकामय एषः शिष्याणां कथितोह्युपदेशः ।
येषां चित्ते नैव विवेकस्ते पच्यंते नरकमनेकम् ॥ १३ ॥
॥ इति **श्रीशंकराचार्य**विरचितं द्वादशपंजरिकास्तोत्रं संपूर्णम् ॥

---

१. आद्य श्रीशंकराचार्य यांचीं वरीलें दोन्हीं स्तोत्रें बहुतेकांच्या पाठांत असतातच. भाषा संस्कृत असूनही सहज समजण्याजोगी सोपी आहे.

# ६ पांडवगीता.

[ पांडवगीतानामक एक सर्वोत्कृष्ट स्तोत्र आहे. त्यांत कौरव, पांडव, त्यांच्या स्त्रिया, उभयपक्षीय वीर व अनेक संतमुनी यांनीं केलेलीं श्रीकृष्णस्तुतीचीं श्लोक-सुमनें एकत्र गुंफून हा दिव्य पांडवगीताहार तयार झालेला आहे. यांतील ८० श्लोकांपैकीं कांहीं वेंचक श्लोक दिले आहेत, त्यांपैकीं निम्मे श्लोक तर प्रसिद्धच आहेत. ]

**पांडवः—** प्रल्हादनारदपराशरपुंडरीक—व्यासांबरीषशुक-
शौनकभीष्मदाल्भ्यान् । रुक्मांगदार्जुनवाशिष्ठ-
बिभीषणादीन् पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥ १ ॥

**लोमहर्षणः—** धर्मो विवर्धति युधिष्ठिरकीर्तनेन
पापं प्रणश्यति वृकोदरकीर्तनेन ॥
शत्रुर्विनश्यति धनंजयकीर्तनेन
माद्रीसुतौ कथयतां न भवंति रोगाः ॥ २ ॥

**ब्रह्माः—** ये मानवा विगतरागपरावरज्ञा
नारायणं सुरगुरुं सततं स्मरंति ॥
ध्यानेन तेन हतकिल्बिषचेतनास्ते
मातुः पयोधररसं न पुनः पिबंति ॥ ३ ॥

**युधिष्ठिरः—** मेघश्यामं पीतकौशेयवासं
श्रीवत्सांकं कौस्तुभोद्भासितांगम् ॥
पुण्योपेतं पुंडरीकायताक्षं
विष्णुं वंदे सर्वलोकैकनाथम् ॥ ४ ॥

**कुंतीः—** स्वकर्मफलनिर्दिष्टां यां यां योनिं व्रजाम्यहम् ।
तस्यां तस्यां हृषीकेश ! त्वयि भक्तिर्दृढाऽस्तु मे ॥ ५ ॥

**द्रुपदः—** कीटेषु पक्षिषु मृगेषु सरीसृपेषु ।
रक्षःपिशाचमनुजेष्वपि यत्र यत्र ॥
जातस्य मे भवतु केशव त्वत्प्रसादात् ।
त्वय्येव भक्तिरचलाऽव्यभिचारिणी मे ॥ ६ ॥

**अभिमन्युः**— गोविंद गोविंद हरे मुरारे गोविंद गोविंद रथांगपाणे ।
गोविंद गोविंद मुकुंद कृष्ण गोविंद गोविंद नमो नमस्ते ॥७॥

**उद्धवः**— वासुदेवं परित्यज्य योऽन्यं देवमुपासते ।
तृषितो जान्हवीतीरे कूपं वाञ्छति दुर्भगः ॥ ८ ॥

**विदुरः**— वासुदेवस्य ये भक्ताः शांतास्तद्गतमानसाः ।
तेषां दासस्य दासोऽहं भवेज्जन्मनिजन्मनि ॥ ९ ॥

**भीष्मः**— विपरीतेषु कालेषु परिक्षीणेषु बंधुषु ।
त्राहि मां कृपया कृष्ण शरणागतवत्सल ॥ १० ॥

**द्रोणः**— ये ये हताश्चक्रधरेण राजंस्त्रैलोक्यनाथेन जनार्दनेन ।
ते ते गता विष्णुपुरीं प्रयाताः क्रोधोऽपि देवस्य वरेण तुल्यः ११

**गांधारीः**— त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।
त्वमेव विद्या द्रविण त्वमेव त्वमेव सर्वं मम देवदेव ॥ १२ ॥

**प्रल्हादः**— नाथ योनिसहस्रेषु येषु येषु व्रजाम्यहम् ।
तेषु तेष्वचला भक्तिरच्युतास्तु सदा त्वयि ॥ १३ ॥
या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनि ।
त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्मापसर्पतु ॥ १४ ॥

**भरद्वाजः**— लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः ।
येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः ॥ १५ ॥

**अत्रिः**— गोविंदेति सदा स्नानं गोविंदेति सदा जपः ।
गोविंदेति सदा ध्यानं सदा गोविंदकीर्तनम् ॥ १६ ॥

**आविर्होत्रः**—कृष्ण त्वदीयपदपंकजपंजरांते अद्यैव मे विशतु मानसराजहंसः । प्राणप्रयाणसमये कफवातपित्तैः कंठावरोधनविधौ स्मरणं कुतस्ते ॥ १७ ॥

**विदुरः**— हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम् ।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥ १८ ॥

वसिष्ठः— कृष्णेति मंगलं नाम यस्य वाचि प्रवर्तते।
भस्मीभवंति तस्याशु महापातककोटयः ॥ १९ ॥

दुर्योधनः— जानामि धर्मं नच मे प्रवृत्ति-र्जानामि पापं नच मे निवृत्तिः।
केनापि देवेन हृदि स्थितेन यथा नियुक्तोऽस्मि तथा करोमि ॥ २० ॥

सुभद्राः— एकोऽपि कृष्णस्य कृतः प्रणामो दशाश्वमेधावभृथेन तुल्यः ।
दशाश्वमेधी पुनरेति जन्म कृष्णप्रणामी न पुनर्भवाय ॥२१॥

गर्गः— नारायणेति मंत्रोऽस्ति वागस्ति वशवर्तिनी ।
तथापि नरके घोरे पतंतीत्येतदद्भुतम्!! ॥ २२ ॥

पराशरः— सकृदुच्चरितं येन हरिरित्यक्षरद्वयम् ।
बद्धः परिकरस्तेन मोक्षाय गमनंप्रति ॥ २३ ॥

व्यासः— सत्यं सत्यं पुनःसत्यं भुजमुत्थाप्य चोच्यते ।
न वेदाच्च परं शास्त्रं न देवः केशवात्परः ॥ २४ ॥

धन्वंतरीः— अच्युतानंत गोविंद नामोच्चारणभेषजात्।
नश्यंति सकला रोगाः सत्यं सत्यं वदाम्यहम् ॥ २५ ॥

मार्कंडेयः— सा हानिस्तन्महच्छिद्रं साचांधजडमूढता ।
यन्मुहूर्तं क्षणं वापि वासुदेवं न चिंतयेत् ॥ २६ ॥

श्रीशुकः— आलोड्य सर्वशास्त्राणि विचार्यैव पुनः पुनः।
इदमेकं सुनिष्पन्नं ध्येयो नारायणः सदा ॥ २७ ॥

श्रीमहादेवः— शरीरं च नवच्छिद्रं व्याधिग्रस्तं कलेवरम् ।
औषधं जाह्नवीतोयं वैद्यो नारायणो हरिः ॥ २८ ॥

शौनकः— भोजनाच्छादने चिंतां वृथा कुर्वन्ति वैष्णवाः ।
योऽसौ विश्वंभरो देवः स भक्तान्किमुपेक्षते ? ॥ २९ ॥
आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।
सर्वदेवनमस्कारः केशवंप्रति गच्छति ॥ ३० ॥

---

## ७ सकाळसंध्याकाळच्या आरत्या.

### १ कांकडआरती (१)

उठा उठा हो साधक साधा आपुलालें हित । गेला गेला हा नरदेह मग कैंचा भगवंत ॥ १ ॥ उठा उठा हो वेगेंसी चला जाऊं राउळासी । झडतिल पातकांच्या राशी कांकडआरती पाहोनी ॥ ध्रु० ॥ जागे करा रुक्मिणीवरा देव आहे निद्सुरा । वेगें निंबेंलोण करा दृष्ट होईल म्हणउनियां ॥ २ ॥ उठोनियां हो पांहटे पहा विठल उभा विटे । चरण तयाचे गोमटे अमृतदृष्टी अवलोका ॥ ३ ॥ पुढें वाजंत्रीं वाजती ढोल दमामे गर्जती । होती कांकडआरती माझ्या पंढरिरायाची ॥ ४ ॥ सिंहनाद शंख भेरी गजर होतो महाद्वारीं । केशवराज विटेवरी **नामा** चरण वंदीतो ॥ ५ ॥

### २ कांकडआरती (२).

भक्तीचीये पोटीं बोधकांकडाज्योती । पंचप्राण जीवेंभावें ओंवाळूं आरती ॥१॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा । दोन्ही कर जोडूनि चरणीं ठेविला माथा ॥ ध्रु०॥ काय माहिमा वर्णू आतां सांगणें तें किती । कोटीब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥२॥ राही रखुमाई उभ्या दोन्ही दोंबाहीं । मयूरपिच्छचामरें ढाळिती ठाईंच्या ठाईं ॥ ३ ॥ विटेसहित पाय म्हणूनी भावें ओंवाळूं । कोटि रविशशि दिव्य उगवले हेळूं ॥ ४ ॥ **तुका** म्हणे दीप घेउनी उन्मनीतशोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ५ ॥

### ३ आरती गणपतीची.

सुखकर्ता दुःखहर्ता वार्ता विघ्नाची । नुरवी पुरवी प्रेम कृपा जयाची । सर्वांगीं सुंदर उटि शेंदुराची । कंठीं झळके माळ मुक्ताफळांची ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय मंगळमूर्ती । दर्शनमात्रें मनःकामना पुरती ॥ ध्रु० ॥ रत्नखचित फरा तुज गौरीकुमरा । चंदनाची उटी कुंकुमकेशरा । हिरेजडित मुगुट शोभतो बरा । रुणझुणती नूपुरें चरणीं घागरिया ॥ २ ॥

---

१ योगनिद्रेंत असलेला. २ मीठमोहऱ्या ओवाळणें. ३ चरणशोभेपुढें तुच्छ मानूं. ४ पिंपळवण ( रुक्मिणीस्वयंवर ७–२१. )

लंबोदर पीतांबर फणिवेरबंधना । सरळ सोंड वक्रतुंड त्रिनयना । दास रामाचा वाट पाहे सदना । संकष्टीं पावावें निर्वाणी रक्षावें सुरवरदंवना ॥३॥

### ४ आरती शंकराची

लवथवती विक्राळा ब्रह्मांडीं माळा । वीषें कंठीं काळा त्रिनेत्रीं ज्वाळा । लावण्य सुंदर मस्तकीं बाळा । तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझुळां ॥ १ ॥
जयदेव जयदेव जयश्रीशंकरा । आरती ओंवाळूं तुज कर्पुरगौरा ॥ ध्रु० ॥
कर्पुरगौर भोळा नयनीं विशाळा । अर्धांगीं पार्वती सुमनांच्या माळा । विभूतीचें उधळण शितिकंठ नीळा । ऐसा शंकर शोभे उमा वेल्हाळा ॥२॥
देवीं दैत्यीं सागरमंथन पैं केलें । त्यामाजी अवचित हळहळ जें उठलें ॥ तें त्वां आनंदें प्राशन केलें । 'नीलकंठ' नाम प्रसिद्ध झालें ॥ ३ ॥
व्याघ्रांबर-फणिवरधर सुंदर मदनारी । पंचानन मनमोहन मुनिजनसुखकारी । शतकोटीचें बीज[३] वाचे उच्चारी । रघुकुळटिळक राम दासाअंतरीं ॥ ४ ॥

### ५ आरती देवीची.

दुर्गे दुर्घट भारी तुजविण संसारीं । अनाथनाथे अंबे करुणा विस्तारीं । वारीं वारीं जन्ममरणांतें वारीं । हारीं पडलों आतां संकट नीवारीं ॥ १ ॥
जयदेवी जयदेवी जय महिषासुरमथनीं । सुरवर ईश्वरवरदे तारक संजिवनी ॥
त्रिभुवनभुवनीं पाहतां तुजऐशी नाहीं । चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं । सोही विवाद करितां पडले प्रवाहीं । ते तूं भक्तांलागीं पावसि लवलाहीं ॥२॥
प्रसन्नवदने प्रसन्न होसी निजदासां । क्लेशापासुनि सोडीं तोडीं भवपाशा । अंबे तुजवांचून कोण पुरविल आशा । नरहरि तल्लिन झाला पदपंकजलेशा ॥३॥

### ६ आरती व्यंकटेशाची.

शेषाचल अवतार तारक तूं देवा । सुरवरमुनिवर[६] भावें करिती जन सेवा ॥ कमलारमणा अससी अगणितगुणठेवा । कमलाक्षा मज रक्षीं सत्वर वर द्यावा ॥१
जयदेव जयदेव जय व्यंकटेशा । केवळ करुणासिंधो पुरवीशी आशा ॥ ध्रु० ॥

---

१ फणिवर म्ह० सर्प. सर्पाचें भक्ष्य जे उंदीर ते गणपतीचें वाहन असल्यामुळें भक्तच होत. देव स्वभक्तांच्या शत्रूंचे संहारक आहेत. २ भस्मचर्चन ३. शतकोटि रामायणाचें सारसर्वस्व जें रामनाम. ४ वेद. ५ शास्त्रें. ६ श्रीविष्णूचा.

हें निजवैकुंठ म्हणुनी ध्यातों मी तूतें। दाविशि गुणें कैसे सकळिक लोकांतें। देखुनि तुझें स्वरूप सुख अद्भुत होतें। ध्यातों तुजला **श्रीपती** दृढ मानस होतें॥

## ७ आरती कृष्णाची.

ओवाळूं आरती मदनगोपाळा। श्यामसुंदर गळां वैजयंती माळा॥ ध्रु०॥ चरणकमळ ज्याचें अति सुकुमार। ध्वजवज्रांकुश चरणीं ब्रीदाचा तोडर।१। नाभिकमळीं ज्याच्या ब्रह्मयाचें स्थान। हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन २ मुखकमळ ज्याचें पाहतां सूर्याच्या कोटी। वेधियलें मानस हारपली दृष्टी ३ जडित मुगुट ज्याचा देदीप्यमान। तेणें तेजें कोंदलें अवघें त्रिभुवन॥ ४॥ **एका जनार्दनीं** देखियलें रूप। रूपचि पाहतां अवघें झालें तद्रूप॥ ५॥

## ८ आरती रामाची. ( १ )

उत्[1]कट साधुनि शिळा सेतू बांधोनि। लिंगदेहलंकापुर विध्वंसूनी। कामक्रोधादिकं राक्षस मर्दूनी। देह-अहंभाव रावण निवटूनी॥ १॥ जय देव देव जय निजबोधा रामा। परमार्थें आरती, सद्भावें आरती, परिपूर्णकामा॥ ध्रु०॥ प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला। लंकादहन करुनी अखयां[2] मारीला। मारीला जंबूमाळी भुवनिं त्राहाटीला[3]। आनंदाची गूढी घेउनियां आला॥ २॥ निजबळें निजभक्ती सोडवीली सीता। म्हणुनी येणें झालें अयोध्ये रघुनाथा। आनंदें वोसंडे वैराग्य भरता। आरति घेउनि आली कौसल्यमाता॥ ३॥ अनुहतध्वनी गर्जति अपार। अठरापद्में वानर करिती भुभुःकार। अयोध्येसी आले दशरथकुमर। नगरीं होत आहे आनंद थोर॥ ४॥ सहजसिंहासनीं राजा रघुवीर। सोहंभावें तया पूजा-उपचार। सहजाची आरती वाद्यांचा गजर। **माधवदासा** स्वामी आठव ना विसर॥ ५॥

## ९ आरती रामाची. (२)

ऐक बा! रामराया! तुझ्या वंदितों पाया। आवरी आपुली हे विश्वमोहिनी माया॥ ध्रु०॥ मी मूढ हीन दीन सर्वसत्क्रियाहीन। तूं क्षमाशील

---

१ मोठाल्या शिळा मिळवून. २ रावणपुत्र. ३ पिटून काढला.

देवा । शुद्धचरितानिजाधीन ॥ १ ॥ घडो सदा साधुसंग नसो विषयप्रसंग । सप्रेम भक्ति द्यावी सत्त्व वैराग्य अभंग॥ २ ॥ वाटतें नित्य भावें तुझे साधुगुण गावें । मन हें आवरेना सांग ! काय म्यां करावें ? ॥ ३ ॥ करितां संसारकाम मुखीं असो तुझें नाम । दयाघना भक्त **मोर** याचा पुरविसी काम ॥ ४ ॥

### १० आरती आत्मारामाची (३)

नानादेहीं देव एक विराजे । नाना नाटकलीला सुंदररूप साजे । नाना तीर्थीं क्षेत्रीं अभिनव गति गाजे । अगाध महिमा तूझा ब्रह्मांडीं गाजे ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय आत्मारामा । निगमागम शोधितां न कळे गुणसीमा ॥ जय० ॥ ध्रु० ॥ बहुरूपी बहुगूणी बहुतां काळाचा । हरिहरब्रह्मादिक देव सकळांचा । युगानुयुगीं आत्माराम आमुचा । दास म्हणे महिमा न बोलवे वाचा ॥ जय० ॥ २ ॥

### ११ आरती मारुतीची.

सत्राणें[1] उड्डाणें, हुंकार वदनीं । करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनीं। कडाडिलें ब्रह्मांड धोका त्रिभुवनीं। सुरवर नर निशाचर त्या जाल्या पळणी।१। जयदेव जयदेव जयजय हनुमंता। तुमचेनि प्रतापें न भियें कृतांता ॥ ध्रु० ॥ दुमदुमिलें पाताळ उठिला पडशब्द[3] । धगधगिला धरणीधर मानिला खेद ॥ कडाडिले पर्वत उडुगण उच्छेद । **रामीरामदासा** शक्तीचा शोध ॥ २ ॥

### १२ आरती विठ्ठलाची.

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा । पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरीं जगा ॥१॥ जय देव जय देव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा राहीच्या वल्लभा पावे जिवलगा ॥ जय देव० ॥ ध्रु० ॥ तुळशीमाळा गळां कर ठेउनि कटीं । कासे पितांबर कस्तुरि लल्लाटीं । देव सुरवर नित्य येती भेटी । गरुडहनुमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥ धन्य वेणुनाद अनुक्षेत्रपाळा । सुवर्णाचीं कमळें वनमाळा गळां । राईरखुमाबाई राणीया सकळा । ओंवाळिती राजा

---

१ सदाचारी जे स्वभक्त त्यांच्या आधीन. २ निष्प्रतिबंध, अकुंठ. ३ प्रतिध्वनि.

विठोबा सांवळा ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या कुर्वंड्या येती । चंद्रभागेमाजी सोडुनियां देती । दिंड्या पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेतीरीं स्नानें जे करिती । दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ती । केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ जय देव० ॥ ५ ॥

## १३ आरती दत्ताची.

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा । त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा । नेति नेति शब्दें नये अनुमाना। सुरवरमुनि जनयोगि समाधि नये ध्याना ॥१॥ जय देव जय देव जय श्रीगुरुदत्ता । आरती ओंवाळितां हरली भवचिंता ॥ध्रु०॥ सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त । अभाग्यासी कैंची कळे ही मात !॥ पराही परतली तेथें कैंचा हा हेत । जन्ममरणाचाही पुरलासे अंत ॥ जय०॥ २ ॥ दत्त येऊनीयां उभा ठाकला । साष्टांगनमनें प्रणिपात केला । प्रसन्न होऊनी आशिर्वाद दिधला । जन्मरणाचा बा ! फेरा वांचविला ॥ जय० ॥ ३ ॥ 'दत्त दत्त' ऐसें लागलें ध्यान । हारपलें मन झालें उन्मन । मीतूंपणासी झाली बोळवण । **एका जनार्दनीं** दत्त हा जाण ॥ जय० ॥ ४ ॥

## १४ आरती खंडोबाची.

पंचानन हयवाहन सुरभूषणलीला । खंडामंडित दंडित दानव अवलीला । मणिमल्ल मर्दूनि धूंसर जो पिंवळा । करिकंकण बाशिंगें सुमनांच्या माळा ॥ १ ॥ जय देव जय देव जयजय मल्हारी । वारी दुर्जन वारी तारी सज्जन तारी निंदक अपहारी ॥ ध्रु० ॥ सुरवर सैंवर वर दे मज नाना देवा । नाना नामें गाइन घडे तुझी सेवा । अगणित गुण गावया वाटतसे हेवा । फणिवर शिणला तेथें नरपामर केवा ॥ २ ॥ रघुवीरस्मरणें हृदयीं शंकर नीवाला । तो हा मदनांतक अवतार झाला । यालागीं आवडी भावें वर्णीला । **रामीरामदासा** जिवलग भेटला ॥ ३ ॥

---

१ दीप, कापुरार्त्या. २ सत्त्वगुणाची देवता विष्णु, रजोगुणाची ब्रह्मदेव, तमोगुणाची शंकर. तीनही गुणांची पण त्रिगुणातीत देवता दत्त. ३ हळद.

## १५ आरती सद्गुरूची (१).

सुखसहिता दुःखरहिता निर्मळ एकांता । कलिमलदहना गहना स्वामी समर्था । न कळे ब्रह्मादिकां अंत अनंता । तो तूं आम्हां सुलभ जय कृपावंता ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय करुणाकरा । आरति ओंवाळूं सद्गुरु माहेरा ॥ जयदेव जयदेव० ॥ ध्रु० ॥ मायेविण माहेर विश्रांती ठाव । शब्दीं अर्थलाभ बोलणीं वाव । सद्गुरुप्रसादें सुलभ उपाव । **रामीरामदासा** फळला सद्भाव ॥ २ ॥ जयदेव जयदेव० ॥

## १६ आरती सद्गुरूची (२).

फळलें भाग्य माझें । धन्य झालों संसारीं ॥ सद्गुरू भेटला हो । तेणें धरियेलें करीं ॥ पश्चिमेसि चालवीलें[१] । आत्मस्थिति निर्धारीं ॥ त्रिकूटावरि नांदे । देखियेली पंढरी ॥ १ ॥ तें सुख काय सांगों । वाचे बोलतां नये । आरतीचेनि गुणें । गेलें मीपण माझें ॥ ध्रु० ॥ राऊळामाजी जातां । राहे देहअवस्था ॥ मन[२] हें उन्मन झालें । नसे बद्धतेची वार्ता ॥ हेतु हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ॥ तटस्थ होउनि ठेलें । निजरूप पाहतां ॥ २ ॥ आनंदसागरांत । प्रेमें बुडी दीधली ॥ लाधलें सौख्य मोठें । नये बोलतां बोली ॥ सद्गुरूचेनि संगें । ऐसी आरती केली ॥ **निवृत्तिआनंदानें** तेथें प्रवृत्ति निमाली ॥ ३ ॥

## १७ आरती ज्ञानेश्वरांची.

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा ॥ सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ ध्रु० ॥ लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ॥ अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ १ ॥ प्रगट गुह्य[३] बोले । विश्व ब्रह्माचि केलें ॥ **रामाजनार्दनीं** । पायीं टकचि[४] ठेलें ॥ २ ॥ आरती० ॥

---

१ ज्ञानेश्वरी अ. ६ ओंव्या १५०–१६० पहा. ' निगिजे पूर्वीलिया मोहरा । कीं येइजे पश्चिमेचिया घरा । निश्चळपणें धनुर्धरा । चालणें येथींचें ॥ १५९ ॥' २ मन, चित्त. ३ गुह्य प्रकट केलें, परब्रह्मप्राप्ति सुलभ केली. ४ ताटस्थ्य; मन तन्मय झालें.

### १८ आरती एकनाथाची.

आरती एकनाथा । महाराजा समर्था ॥ त्रिभुवनीं तूंचि थोर । जगद्गुरु जगन्नाथा ॥ ध्रु० ॥ एकनाथ नाम सार । वेदशास्त्रांचें गूज ॥ संसारदुःख नासे । महामंत्राचें बीज ॥ १ ॥ एकनाथ नाम घेतां । सुख वाटतें चित्ता । आनंद **गोपाळदासा** । घणी न पुरे गातां ॥ २ ॥ आरती० ॥

### १९ आरती तुकारामाची.

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरुधामा ॥ सच्चिदानंदमूर्ती । पाय दाखवी आम्हां ॥ ध्रु० ॥ राघवें सागरांत । पाषाण तारिले ॥ तैसे हे तुकोबाचे । अभंग रक्षिले ॥ १ ॥ तुकितां तुळणेसी । ब्रह्म तुकासि आलें । म्हणुनी **रामेश्वरें** । चरणीं मस्तक ठेविलें ॥ २ ॥ आरती० ॥

### २० आरती समर्थांची.

आरती रामदासा । सद्गुरु सर्वेशा ॥ कायावाचामनोभावें । वोवाळू परेशा ॥ ध्रु० ॥ रामदास मूर्तिमंत । रामचंद्र–अवतार ॥ कलियुगीं अवतरोनी । केला भक्तांचा उद्धार ॥ १ ॥ वैराग्यभक्तिज्ञान । शांतिक्षमाविरक्त ॥ विवेक सालंकृत । क्षमादया सर्वभूतीं ॥ २ ॥ सच्चिदानंदघन । रामदास केवळ ॥ दिनकरकृपायोगें । **रामचंद्र** निर्मळ ॥ ३ ॥ आरती० ॥

### २१ आरती विष्णूची.

संतसनकादिक भक्त मिळाले आणीक । स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ॥ १ ॥ नवल होताहे आरती देवाधिदेवा । स्वर्गींहुनी सुरवर पाहूं येती केशवा ॥ ध्रु० ॥ नरनारींचें तटस्थ टक पडिलें नयना । श्रीमुख पाहतां धणी न पुरे मना ॥ २ ॥ एका जनार्दनीं मंगल आरत्या गातीं । मिळाले वैष्णव जयजयकार गर्जती ॥ ३ ॥ संत० ॥

### २२ धांवा.

धांव रे रामराया । किती अंत पहासी ॥ ध्रु० ॥ प्राणांत मांडिलासे, नये करुणा कैसी । पाहीन धणिभरी, चरण झाडीन केशीं । नयन

---

१ तृप्ति. २ ' इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः । ' ह्या गीतावचनाप्रमाणें.

शिणले बा, आतां केधवां येशी ॥ धांव० ॥ १ ॥ मीपण अहंकारें, अंगीं भरलासे ताठा । विषयकर्दमांत, लाज नाहीं लोळतां । चिळस उपजेना, ऐसें झालें बा आतां ॥ धांव० ॥२॥ मारुतिस्कंधभागीं, शीघ्र बैसोनि यावें । राघवें वैद्यराजें, कृपा–औषध द्यावें । दयेचे पद्महस्त, माझे शिरीं ठेवावे ॥ धांव० ॥ ३ ॥ या भवीं **रामदास**, थोर पावतो व्यथा । कौतुक पाहतोसी, काय जानकीच्या कांता । दयाळा दीनबंधो, भक्तवत्सला ताता ॥ ॥ धांव ० ॥ ४ ॥

**२३ पाळणा.**

जो जो जो जो रे श्रीरामा । निजसुखगुणविश्रामा ॥ जो जो० ॥ध्रु०॥
ध्याती मुनियोगी तुजलागीं । कौसल्यावोसंगीं ॥ १ ॥
वेदशास्त्रींची मति जाण । स्वरूपीं झाली लीन ॥ २ ॥
चारी मुक्तींचा विचार । चरणीं पाहति थोर ॥ ३ ॥
भोळा शंकर निशिदीनीं । तुजला जपतो मनीं ॥ ४ ॥
**दास** गातसे पाळणा । रामलक्ष्मणा ॥ ५ ॥

**- २४ प्रदक्षिणा**

धन्य धन्य हे प्रदक्षिणा सद्गुरुरायाची ।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची ॥ ध्रु० ॥
पदोपदीं अपार झाल्या पुण्याच्या राशी ।
सर्वहि तीर्थें घडली आम्हां आदिकरुनि काशी ॥ १ ॥
मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थें गाती ।
नामसंकीर्तनें नित्यानंदें नाचती ॥ २ ॥
कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत ।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ॥ ३ ॥
गुरुभजनाचा महिमा न कळे आगमानिगमांसी ।
अनुभवि ते जाणती जे गुरुपदिंचे रहिवासी ॥ ४ ॥
प्रदक्षिणा करूनि देह भावें वाहीला ।
**श्रीरंगात्मज विठ्ठल** पुढें उभा राहिला ॥ ५ ॥

## २५ विडा श्रीकृष्णाचा.

विडा घ्याहो नारायणा । कृष्णा जगत्त्रजीवना ।
विनविते रखुमाई । दासी होईन मी कान्हा ॥ विडा० ॥ ध्रु० ॥
शांती ही नागवेली- । पान घेऊनियां करीं ।
मीपण जाळूनीयां । चुना लाविला वरी ॥ विडा० ॥ १ ॥
वासना फोडुनीयां । चूर्ण केली सूपारी ।
भावार्थकापरानें । घोळियेली निर्धारीं ॥ विडा० ॥ २ ॥
विवेककातरंग । रंगीं रंगला सुरंग ।
वैराग्यजायफळ । मिळविलें अभंग ॥ विडा० ॥ ३ ॥
दया ही जायपत्री । क्षमालवंगा आणील्या ।
सुबुद्धिवेलदोडे । **शिवरामीं** अर्पियेले ॥ विडा० ॥ ४ ॥

## २६ विडा श्रीरामाचा.

विडा घ्याहो रामराया ! । महाराजराजया ! ॥ ध्रु० ॥
रत्नजडित पानदान । आली जानकी घेवोन ।
विडा देती करूनीयां । दीनबंधो रामराया ॥ १ ॥
सुगंध गंगेरी पानें । मुक्त मोतियाचा चूना ।
सुपारी कातगोळ्या । भक्तिभावें मिळवील्या ॥ २ ॥
जायपत्री जायफळ । विडा जाहला सुफळ ।
सीता रामालागीं देत । केशरकस्तुरीयुक्त ॥ ३ ॥
सीताराम विडा घेतां । ऐक्यभावें एकात्मता ।
रंगली ऐक्यरंगीं । **रामदास** पायांलागीं ॥ ४ ॥

## २७ कृष्णाची शेजारती.

हरि चला मंदिरा ऐशा म्हणती गोपिका ( राधिका )।
भावें ( भक्तीं ) ओवाळिती यादवकुळटिळका ॥ १ ॥
एकीकडे राही एकीकडे रखुमाई ।
भावें ओवाळितां हरि जाला दों ठायीं ॥ २ ॥

अष्टाधीक सोळा सहस्र ज्याच्या सुंदरा ।
ज्या ज्यांनीं प्रार्थिला गेला तयांचिया घरा ॥ ३ ॥
एका जनार्दनीं हरि तूं लाघवी होसी ।
इतक्याही भोगुनी ब्रह्मचारी म्हणवीसी ॥ ४ ॥

### २८ विठोबाची शेजारती.

पावला प्रसाद आतां विठो निजावें ।
आपला तो श्रम कळों येतसे भावें ॥ १ ॥
आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा ।
पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥
तुम्हांसी जागविलें आम्हीं आपुलिया चाडा ।
शुभाशुभकर्में दोष हरावया पीडा ॥ ३ ॥
तुका म्हणे दिलें उच्छिष्टाचें भोजन ।
नाहीं निवडिलें आम्हां आपुलिया भिन्न ॥ ४ ॥

---

## ८ उपसंहार.

करोनी आरती । चक्रपाणी ओंवाळिती ॥ १ ॥
आजी पुरले नवस । धन्य काळ हा दिवस ॥ ध्रु० ॥
पहा पहावो सकळा । पुण्यवंता तुम्ही बाळा ॥ २ ॥
तुका वाहे टाळी । उभा सान्निध जवळी ॥ ३ ॥

१

या रे नाचूं प्रेमानंदें । रामनामाचिया छंदें ॥ १ ॥
कैसा नामाची आवडी । पाप पळे देशधडी ॥ ध्रु० ॥
आवडीनें नाम घोका । शरण जनार्दना एका ॥ २ ॥

२

शेवटची विनवणी । संतजनीं परिसावी ॥ १ ॥
विसर तो न पडावा । माझा देवा तुम्हांसी ॥ ध्रु० ॥

आतां फार बोलूं काय । अवघें पायीं विदित ॥ २ ॥
तुका म्हणे पडलों पायां । करा छाया कृपेची ॥ ३ ॥

३

अवघोंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां । चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥ १ ॥
माय जगन्नाथ बाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जनार्दन ॥ २ ॥
एका जनार्दनीं एकपणें उभा । चैतन्याचा गाभा शोभतसे ॥ ३ ॥

४

गोविंदा रामा । जय जय गोपाळा रामा ॥ १ ॥
यादवा रामा । जय जय माधवा रामा ॥ २ ॥
सुलभा रामा । जय जय दुलभा रामा ॥ ३ ॥
एक तूं रामा । जय जय अनेक तूं रामा ॥ ४ ॥
एका जनार्दनीं रामा । जय जय निष्कामा रामा ॥ ५ ॥

५

हेंचि व्हावी माझी आस । जन्मोजन्मीं तुझा दास ॥ १ ॥
पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदी हरी ॥ २ ॥
संतसंग सर्वकाळ । अखंड प्रेमाचा सुकाळ ॥ ३ ॥
चंद्रभागे स्नान । मागें हेंचि तुका दान ॥ ४ ॥

६

पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥
मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ती ॥ २ ॥
नव्हे हा उपदेश । तुमचें वडवडिलों शेष ॥ ३ ॥
तुमचे कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥ ४ ॥

७

मागणें तें एक तुजप्रती आहे । देशी तरी पाहे पांडुरंगा ॥ १ ॥
या संतांसीं निरवीं हेंचि मज देईं । आणिक तुज कांहीं न मागों देवा ॥ २ ॥
तुका म्हणे आतां उदार तूं होईं । मन ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥

घालिन लोटांगण वंदिन चरण डोळ्यांनिं पाहिन रूप तुझें ।
प्रेमें आलिंगिन आनंदें पूजिन भावें ओवाळिन म्हणे नामा ॥ १ ॥
कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥ २ ॥
अच्युतं केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ ३ ॥
अच्युतं केशवं सत्यभामाधवं माधवं श्रीधरं राधिकाऽराधितम् ।
इंदिरामंदिरं चेतसा सुंदरं देवकीनंदनं नंदजं संदधे ॥ ४ ॥
विष्णवे जिष्णवे शंखिने चक्रिणे रुक्मिणीरागिणे जानकीजानये ।
बल्लवीवल्लभायार्चितायात्मने कंसविध्वंसिने वंशिने ते नमः ॥ ५ ॥
आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् ।
लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥ ६ ॥
आरामः कल्पवृक्षाणां विरामः सकलापदाम् ।
अभिरामस्त्रिलोकानां रामः श्रीमान्स नः प्रभुः ॥ ७ ॥
नमस्ते पुरुषाध्यक्ष नमस्ते भक्तवत्सल ।
नमस्तेऽस्तु हृषीकेश नारायण नमोऽस्तु ते ॥ ८ ॥
नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।
सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥ ९ ॥
हरे राम हरे राम रामराम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्णकृष्ण हरे हरे ॥ १० ॥
जय पुंडलीकवरदे हरिविठ्ठल । ज्ञानदेव तुकाराम ॥

---

## ९ भजनें.

( १ ) राम कृष्ण हरी । जय जय राम कृष्ण हरी ॥
( २ ) विठोबा रखुमाई । जय जय विठोबा रखुमाई ॥
( ३ ) रघुपतिराघव राजाराम । पतीतपावन सीताराम ॥
( ४ ) रामलक्ष्मण जानकी । जय बोलो हनुमानकी ॥

( ५ ) राम राम राम जप सीताभिराम । सीताभिराम ॥ राम० ॥
( ६ ) मारुतिराया बलभीमा । शरण आलों मज द्या प्रेमा ॥
( ७ ) दत्तात्रय अवधूता । जनार्दनस्वामी एकनाथा ॥ गुरुदत्ता० ॥
( ८ ) रामदास गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायीं ॥
( ९ ) जयजय रामकृष्ण हरी । सांवळ्या रामकृष्ण हरी ॥
( १० ) शिव हर रे शिव हर रे । सांब सदाशिव शिव हर रे ॥
शिवहर शंकर गौरीशं । वंदे गंगाधरमीशम् ॥
( ११ ) ज्ञानोबा माउली तुकाराम ॥
( १२ ) जीवाचे जिवलगे । मनाचे मोहने । येई पांडुरंगे ॥
( १३ ) राम हरे गोविंद । शिव शिव । कृष्ण हरे गोविंद ॥
( १४ ) नारायण नारायण जय गोविंद हरे ।
नारायण नारायण जय गोपाळ हरे ।
( १५ ) गुरु महाराज गुरु । जय जय परब्रह्म सद्गुरु ॥
( १६ ) नारायण विधि अत्रीनाथ । दत्त जनार्दन एकनाथ ॥
( १७ ) कृष्ण गोविंद गोविंद । गोपाळ राधे ॥
( १८ ) सच्चित्प्रेमानंदू । भज रे गोविंदू गोविंदू ॥
( १९ ) राधाकृष्ण जय कुंजविहारी ।
मुरलीधर गोवर्धनधारी ॥ १ ॥
( २० ) निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई ।
एकनाथ नामदेव तुकाराम ॥ १ ॥
आवडीनें हीं नामें गातां ।
ते नर पावति मंगलधाम ॥ २ ॥
( २१ ) ज्ञानेश्वर माउली । ज्ञानराज माउली तुकाराम ।
( २२ ) नारायण विधि वासिष्ठ राम । रामदास कल्याणधाम ॥
( २३ ) रामसीता कृष्णराधा । विठ्ठले रखुमाई ॥
( २४ ) जय विठ्ठल । जय विठ्ठल ॥



# ईश्वरप्रार्थना.

## श्रीरामाचें ध्यान.

रत्नजडित सिंहासन । वरी शोभे रघुनंदन ॥ १ ॥

वामांकीं ते सीताबाई । जगज्जननी माझी आई ॥ २ ॥

पश्चाद्भागीं लक्ष्मण । पुढें अंजनीनंदन ॥ ३ ॥

भरत शत्रुघ्न ते भाई । चौऱ्या ढाळिति दोहीं बाहीं ॥ ४ ॥

नळनीळ जांबुवंत । अंगद सुग्रीव बिभीषण भक्त ॥ ५ ॥

देहबुद्धी नेणों कांहीं । दास अंकित रामापायीं ॥ ६ ॥

## करुणाष्टकें.

(श्रीरामदासस्वामीकृत.)

१

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।
परमदिनदयाळा ! नीरसी मोहमाया ॥
अचपळ[1] मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥
भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति ! मति माझी आपुलीशी करावी ।
सकल त्यजुनि भावें कांस तूझी धरावी ॥ २ ॥

---

१ चंचल, अस्थिर. 'अनुत्तम' ह्या शब्दाप्रमाणें अचपळ या शब्दाची योजना हे समर्थांनीं केली आहे. 'नास्ति चपलो यस्मात् अचपलः' अतिचपल.

तनुमनधन माझें राघवा ! रूप तुझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें ॥
प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचल भजनलीला लागली आस तूझी ॥ ३ ॥
चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना ॥
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरींचा ।
म्हणवुनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ ४ ॥
जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ॥
तळमळ निववीं रे राम कारुण्यसिंधू ।
षडरिपु कुळ माझें तोडिं याचा समंधू ! ॥ ५ ॥
स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ! ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेत सांडोनि जाती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ६ ॥
सकळ जन भवाचे आथिले वभवाचे ।
जिवलग मज कैंचे चालते हेच साचे ॥
विलगविषमकाळीं सांडिती सर्व माळीं ।
रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ ७ ॥
उपरति मज रामीं जाहली पूर्णकामीं ।
सकळजनविरामीं रामविश्रामधामीं ॥
घडि घडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रघुकुळटिळका ! रे आपुलेसें करावें ॥ ८ ॥

---

१ संपन्न, टिकणारें. २ विलग—पटकी वगैरेंचे उपद्रव, विषम—दारिद्र्यपरचक्र वगैरेंचे उपद्रव. विलगकाळीं व विषमकाळीं माळावर कोठें तरी टाकतात. ३ जन म्ह० जन्म. सकळ अपमृत्यूपासून मुक्त करणारा किंवा जन म्ह० दुष्ट जन त्यांचा विराम म्ह० विनाश करणारा श्रीराम.

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं । नसे प्रेम हें रामविश्रांम नाहीं ।
असा दीन अज्ञान मी दास तूझा । समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १ ॥
रघूनायका जन्मजन्मांतरींचा । अहंभाव छेदोनि टाकीं दिनाचा ।
जनीं बोलती दास या राघवाचा । परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ २ ॥
रघूनायका दीन हातीं धरावें । अहंभाव छेदोनियां उद्धरावें ।
अगूणी तयालागिं गूणी करावें । समर्थें भवसागरीं ऊतरावें ॥ ३ ॥
किती भार घालूं रघूनायकाला । मजकारणें शीण होईल त्याला ।
दिनानाथ हा संकटीं धांव घाली । तयाचेनि हे सर्व काया निवाली ॥ ४ ॥
मला कोवसा राम कैवल्यदाता । तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ।
समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें । सदा सर्वदा नाम वाचे वदावें ॥ ५ ॥
दिनाचें उणें दीसतां लाज कोणा । जनीं दास तूझा दिसे दैन्यवाणा ।
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी । तुझा दास पाहे सदा शीघ्रकोपी ॥६॥

२

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां ।
नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥
मन हें आवरेना कीं वासना वावडे सदा ।
कल्पना धांवते सैरा बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥
अन्न नाहीं वस्त्र नाहीं सौख्य नाहीं जनांमधें ।
आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ३ ॥
बोलतां चालतां येना कार्यभाग कळेचिना ।
बहु मी पीडिलों लोकीं बुद्धि दे रघुनायका ॥ ४ ॥
तझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतापरी ।
साख्य तों पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ५ ॥
नेटकें लिहितां येना वाचितां चुकतों सदा ।
अर्थ तों सांगतां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ६ ॥

---

१ आधार. २ मोक्ष-ज्ञान देणारा. ३ सारासारविचार.

प्रसंग वेळ तर्केना सुचेना दीर्घसूचना ।
मैत्रिकी राखितां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ७ ॥

कळेना स्फूर्ति होईना आपदा लागली बहु ।
प्रत्यहीं पोट सोडीना बुद्धि दे रघुनायका ॥ ८ ॥

संसार नेटका नाहीं उद्वेग वाटतो जिवीं ।
परमार्थू कळेना कीं बुद्धि दे रघुनायका ॥ ९ ॥

देईना पुर्विना कोणी उगेचिं जन हांसती ।
विसरू पडतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १० ॥

पिशुनें वाटती सर्वै कोणीही मजला नसे ।
समर्था तूं दयासिंधु बुद्धि दे रघुनायका ॥ ११ ॥

उदास वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे ।
तूं भक्तवत्सला रामा बुद्धि दे रघुनायका ॥ १२ ॥

कायावाचामनोभावें तुझा मी म्हणवीतसें ।
हे लाज तूजला माझी बुद्धि दे रघुनायका ॥ १३ ॥

सोडवील्या देवकोटी भूभार फेडिला बळें ।
भक्तांसि आश्रयो मोठा बुद्धि दे रघुनायका ॥ १४ ॥

उदंड भक्त तुम्हांला आम्हांला कोण पूसतें ।
चीद त राखण आधींबुध्दि दे रघुनायका ॥ १५ ॥

उदंड ऐकिली कीर्ति पतीतपावना प्रभो ।
मी एक रंक दुर्बुद्धि बुद्धि दे रघुनायका ॥ १६ ॥

आशा हे लागली मोठी दयाळू बा दया करी ।
आणीक नलगे कांहीं बुद्धि दे रघुनायका ॥ १७ ॥

रामदास म्हणे माझा संसार तुज लागला ।
संशयो वाटतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १८ ॥

४

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी । अती आदरें सर्व सेवा करावी ।
सदा प्रीति लागो तुझे गुण गातां । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥ १ ॥
तुझें रूप हें लोचनीं म्यां पहावें । तुझे गुण गातां मनेंसी रमावें ।
उठो आवडी भक्तिपंथेंचि जातां ॥ रघू० ॥ २ ॥
मनीं वासना भक्ति तुझी करावी । कृपाळूपणें राघवें पूरवावी ।
वसावें मदीयांतरीं नाम घेतां ॥ रघू० ॥ ३ ॥
सदा सर्वदा योग तूझा घडावा । तुझे कारणीं देह माझा पडावा ।
उपेक्षूं नको गुणवंता अनंता ॥ रघू० ॥ ४ ॥
नको द्रव्यदारा नको येरझारा । नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा ।
सगूणीं मला लाविं रे भक्तिपंथा ॥ रघू० ॥ ५ ॥
भवें तापलों प्रीतिछाया करावी । कृपासागरें सर्व चिंता हरावी ।
मला संकटीं सोडवावें समर्था ॥ रघू० ॥ ६ ॥
मनीं कामना कल्पना ते नसावी । कुबुद्धी कुडी[1] वासना नीरसावी ।
नको संशयो तोडिं संसारवेथा[2] ॥ रघू० ॥ ७ ॥
समर्थापुढें काय मागूं कळेना । दुराशा[3] मनीं बैसली हे ढळेना ।
तुटे संशयो नीरसी सर्व चिंता ॥ रघू० ॥ ८ ॥
ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें । म्हणे दास भक्तासि रे उद्धरावें ।
सुटे बीद आम्हांस सोडोनि जातां ॥ रघू० ॥ ९ ॥

५

विश्वाया ! करुणाकरा ! बहुत मी योनी पहा हिंडलों ।
कोठेंही सुख पाहिलें न नयनीं नानापरी दंडलों ॥
कांहीं पुण्य उभारितां अवचटें आलों नृदेहाप्रती ।
आतां जन्म पुन्हां नको रघुपते दे मुक्ति कीं शीघ्र ती ॥ १ ॥

---

१ वाईट, पापमूलक. २ व्यथा, चिंता. ३ स्त्रीपुत्रधन यांच्याविषयींच्या दुष्ट आशा, लोलुपता.

रामा ! मी तव दासदास म्हणवीं, मातें कशांचें भय ? ।
रामा ! जाइन जे स्थळीं सुखघना ! होईल तेथें जय ! ॥
रामा ! या भुवनत्रयीं तुजविणें नाहीं दुजा तारक ! ।
रामा ! तूं सकळार्थ पूर्ण करिसी तूं तात मी बाळक ॥ २ ॥
न जाणें मी पूजा, न मज समजे ध्यान करणें, ।
न जाणें रूपातें, न कळत कशी प्रीति धरणें, ॥
न जाणें पायांतें, न मज तरि सत्संग घडला, ।
तुझे नामीं रामा ! दिनानिशिं मम प्राण जडला ॥ ३ ॥
तूं सेव्य मी सेवक योग्य नातें । तूं गेय[1] मी गायक, तारि मातें ।
तूं जाप्य मी जापक पूर्णकामा । सायुज्यदाता तरि तूंचि रामा ॥४॥
स्तंभावांचूनि हें उभें नभ असे पृथ्वी जळीं कीं तरे ।
देहो हा बहुछिद्रभग्न असतां त्यामाजि वायू ठरे, ॥
ऐसे खेळ अचाट दावुनि पहा तूं भिन्न सर्वांहुनी, ।
तूतें स्वानुभवें विलोकिति जगीं नैराश्यवेत्ते मुनी ॥ ५ ॥
कोठें माहिष-अंतरांत[2] शिरुनी वेदांतही बोलसी, ।
स्कंधीं कावड वाहसी, निजमुखें कोणापुढें जेविसी ॥
कोठें कागद तारिसी, दळिसि तूं, कोठें पशू ओढिसी ! ।
कोणाचें रिण वारिसी परि मला कां हातिंचा सोडिसी ? ॥ ६ ॥

—पांडुरंग.

## ६. श्रीकृष्णप्रार्थनाष्टक.

त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम्[3] ।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनंतरूप ॥ १ ॥
वायुर्यमोग्निर्वरुणः शशांकः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमोनमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोपि नमोनमस्ते ॥ २ ॥

---

१ स्तव्य, गाण्यास योग्य. २ ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलविले. ३ नाथगृहीं.

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनंतवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोसि सर्वः ॥ ३ ॥
सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात्प्रणयेन वाऽपि ॥ ४ ॥
यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ५ ॥
पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ६ ॥
तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥७॥
किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ८ ॥

—श्रीभगवद्गीता अ० ११.

---

## २ अभंग.

श्रीज्ञानेश्वर ( १–३ )

१

रूप पाहतां लोचनीं । सुख झालें वो साजणी ॥ १ ॥
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥ ध्रु० ॥
बहुता सुकृताची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी ॥ २ ॥
सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥ ३ ॥

२

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
जाइन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥ ध्रु० ॥

सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगीं ॥ २ ॥
**बापरखुमादेवीवरु** विठ्ठलेसीं भेटी । आपुले संवसाठी करूनि ठेला ॥३॥

३

योगियां दुर्लभ तो म्यां देखिला साजणी ।
पाहतां पाहतां मना न पुरे धणी ॥ १ ॥
देखिला देखिला गे माये देवाचा देव ।
फिटला संदेहो निमालें दुजेपण ॥ २ ॥
अनंतरूपें अनंतवेषें देखिलें म्यां त्यासी ।
**बापरखुमादेवीवरु** खूण बाणली कैसी ॥ ३ ॥

श्रीनामदेव ( ४–१६ )

४

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥
प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठलरखुमाई ॥ २ ॥
नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३ ॥
परेहूनि परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ४ ॥
सर्व सत्ता आली हातां । **नामयाचा** खेचर दाता ॥ ५ ॥

५

तुझिया सत्तेनें वेदासी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया बळें ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म तें जाणुनी शरण आलों ॥ २ ॥
मेघांनीं वर्षावें, पर्वतीं बैसावें, । वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥
**नामा** म्हणे कांहीं न हाले साचार । प्रभू तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

६

पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । विठ्ठला भेटावें जिवलगा ॥ १ ॥
काया वाचा मन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥

बाहेरभीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलवे ब्रह्मानंदु ॥ ४ ॥
चिरंजीव **नामा** कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ५ ॥

७

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडीं सर्वथा । आण तुझी पंढरिनाथा ! ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
**नामा** म्हणे केशवराजा । केला पण चालवीं माझा ॥ ४ ॥

८

अमृताहुनी गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ? ॥ १ ॥
सांग पंढरिराया ! काय करूं यासी ? । कां रूप ध्यानासी न ये तुझें ! ॥२॥
कीर्तनीं बैसतां निद्रें नागवीलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥ ३ ॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ती । नये माझ्या चित्तीं **नामा** म्हणे ॥४॥

९

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणीक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥
हेंचि मज घडो जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ २ ॥
मुखीं सदा नाम संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥
**नामा** म्हणे नित्य तुझे महाद्वारीं । कीर्तनगजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

१०

हेचि देवापे मागत । चरणसेवा अखंडित ॥ १ ॥
जन्म हो कां भलत्या याती । परी न चुको हरिभक्ती ॥ २ ॥
**नामा** म्हणे कमळापती । हेंचि द्यावं पुढतपुढती ॥ ३ ॥

११

तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा । पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे ॥ १ ॥
तूं माझी गाउली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥ २ ॥

---

१ देवभक्तांचें नातें मायलेंकरांचें आहे, हें या गोड अभंगांत किती प्रेमळपणानें सांगितलें आहे ! देवाला ' बाप ' म्हणण्यापेक्षां ' आई ' म्हणणेंच उत्तम.

तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घालीं मज पांडुरंगे ॥ ४ ॥
**नामा** म्हणे होशी भक्तीचा वल्लभ । मागें पुढें उभा सांभाळिशी ॥ ५ ॥

१२

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अनाथांचा नाथ होसी तूं दयाळ । किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥ ३ ॥
**नामा** म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां तरी ॥ ४ ॥

१३

तुझें प्रेम माझे हृदया आवडी । चरण मी न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥
इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडीं । प्रेमरसगोडी देईं मातें ॥ २ ॥
चंद्रचकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ? ॥ ३ ॥
**नामा** म्हणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहे ॥ ४ ॥

१४

काय गुणदोष माझे विचारिसी । आहें मी तों राशी अपराधांची ॥ १ ॥
अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ! ! ॥ २ ॥
स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ती । पुससी विरक्ती कोठोनियां ?॥ ३ ॥
तूंचि माझा गुरु तूंचि माझा स्वामी । सकळ अंतर्यामीं गाऊं तुज ॥ ४ ॥
**नामा** म्हणे माझें चुकवीं जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा ॥ ५ ॥

१५

ममता तुटेना मज केशिराजा । अंगीं भाव दुजा लागे पाठीं ॥ १ ॥
शरीरीं तितिक्षा[१] नाहीं क्षमाशांती । यालागीं श्रीपती वायां गेलों ॥ २ ॥
**नामा** म्हणे देवा तारिसी पतीता । म्हणोनियां सत्ता केली आम्हीं ॥ ३ ॥

---

१ शीतोष्णादि द्वंद्वें सोसण्याची शक्ति, सोशिकता.

१६

हरि रे वाढवेळ झाला । कोण्या भक्तानें गोंविला ॥ १ ॥
झडकरि येई गा विठ्ठला । कंठ आळवितां शोषला ॥
प्राण केव्हां येईल माझा । आलिंगील चहूं भुजा ॥ ३ ॥
नामा गहिंवरें दाटला । पूर धरणीये लोटला ॥ ४ ॥

जनाबाई ( १७–२२ )

१७

येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥
भीमा आणि चंद्रभागा । तुझ्या चरणींच्या गंगा ॥ २ ॥
इतुक्यांसहित त्वां बा यावें । माझ्या रंगणीं नाचावें ॥ ३ ॥
माझा रंग तुझे गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१८

ज्याचा सखा हरी । त्यावरि विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघातांचें[1] ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥
आंग आपुलें वोढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ४ ॥
ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

१९

कां गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ! ॥ १ ॥
माय बाप तूंचि धणी । मला सांभाळीं निर्वाणीं ॥ २ ॥
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें कोण मी पामर ! ॥ ३ ॥
दीननाथा दीनबंधु । जनी म्हणे कृपासिंधु ॥ ४ ॥

२०

गंगा गेली सिंधूपाशीं । तेणें अव्हेरीलें तिसी ॥ १ ॥
तिणें सांगावें कवणाला ! । ऐसें बोले गा विठ्ठला ! ॥ २ ॥

---

१ सुखदुःखादिकांचें.

जळ कोपलें जळचरा । माता अव्हेरी कूमरा ॥ ३ ॥
**जनी** म्हणे शरण आले । पाहिजे ते उद्धरिले ! ! ॥ ४ ॥

२१

चिंतन चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥
उन्मनीच्या[1] सुखाआंत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥
कवटाळुनि भेटीपाठीं । **जनी** म्हणे सांगूं गोष्टी ॥ ३ ॥

२२

आम्ही पातकाची राशी । आलों तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥
मना येईल तें तूं करीं । आतां तारीं अथवा मारीं ॥ २ ॥
**जनी** म्हणे सृष्टीवरी । एक असशी तूं बा हरी ॥ ३ ॥

श्रीएकनाथ ( २३–३५ ).

२३

जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें । मग या विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥
जन्मोनी संसारीं झालों त्याचा दास । माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥ २ ॥
भ्रमर सुवासी मधावरी मासी । तैसें या देवासीं मन माझें ॥ ३ ॥
आणिका देवांसीं नेघे माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें ॥ ४ ॥
**एका जनार्दनीं** मज तेथें न्यावें । हाडसोनी घ्यावें संतांपाशीं ॥ ५ ॥

२४

अणुरेणूपासुनी ब्रह्मांडीं भरला । तो म्यां देखिला विटेवरी ॥ १ ॥
स्थावर जंगम भरूनी उरला । तो म्यां देखिला पंढरीये ॥ २ ॥
वेदशास्त्रपुराणें गाती जयासाठीं । तो पुंडलिकापाठीं उभा दिसे ॥ ३ ॥
वेडावल्या श्रुती न कळे म्हणती । तो उभा श्रीपती वाळुवंटीं ॥ ४ ॥
संतांचा समागम गाती आनंदानें । तो हरिकीर्तनें नाचतसे ॥ ५ ॥
**एका जनार्दनीं** सुखाचा सागरू । विठ्ठल कल्पतरू वोळला आम्हां ॥ ६ ॥

---

1 जेथें मन लीन होतें अशी तुर्येच्या पलीकडची पांचवी अवस्था.

२५

तुमचें नामसंकीर्तन । हेंचि माझें संध्यास्नान ॥ १ ॥
तुमचे पायाचा साक्षेप । हाचि माझा कालक्षेप ॥ ध्रु० ॥
तुमचे पायाचें वंदन । हेंचि माझें अनुष्ठान ॥ २ ॥
तुमचे पायापाशीं निद्रा । हेचि माझी प्रेममुद्रा[1] ॥ ३ ॥
एका जनार्दनाकार । ब्रह्मरूप हा संसार ॥ ४ ॥

२६

अनंताचे गुण अनंत अपार । न कळेची पार श्रुतिशास्त्रां ॥ १ ॥
तो हा महाराज विटेवरी उभा । लावण्याचा गाभा शोभतसे ॥ ध्रु० ॥
कटीवरी कर ठेवी जगजेठी[2] । पाहे कृपादृष्टीं भक्ताकडे ॥ २ ॥
पुंडलिकाचे तेजें जोडलासे ठेवा । एका जनार्दना सेवा देई देवा ॥ ३ ॥

२७

कायाँ[3] ही पंढरी आत्मा हा विठ्ठल । नांदतो केवळ पांडुरंग ॥ १ ॥
भावभक्ति भीमा उदक तें वाहे । बरवा शोभताहे पांडुरंग ॥ ध्रु० ॥
दयाक्षमाशांति हेंचि वाळुवंट । मिळालासे थाट वैष्णवांचा ॥ २ ॥
ज्ञान ध्यान पूजा विवेक आनंद । हाचि वेणुनाद शोभतसे ॥ ३ ॥
दश इंद्रियांचा एक मेळा केला । ऐसा गोपाळकाला होत असे ॥ ४ ॥
देहीं देखिली पंढरी जनीं वनीं । एका जनार्दनीं वारी करी ॥ ५ ॥

२८

देवा माझें मन लागो तुझे चरणीं । संसारव्यसनीं पडों नेदी ॥ १ ॥
नामस्मरण घडो संतसमागम । वाऊगाचि भ्रम नको देवा ॥ ध्रु० ॥
पायीं तीर्थयात्रा मुखीं रामनाम । हाचि माझा नेम सिद्धी नेई ॥ २ ॥
आणिक मागणें नाहीं नाहीं देवा । एका जनार्दनीं सेवा दृढ देई ॥ ३ ॥

---

१ प्रेमसमाधि. २ जगन्नाथ. ३ ह्या उत्कृष्ट अभंगाचें निरंतर मनन करावें. याच अर्थाचे चोखामेळा, तुकाराम यांचेही अभंग आहेत.

२९

एकपणें पाहतां सृष्टी। भरला दृष्टी विठ्ठल ॥ १ ॥
नाहीं द्वैताची भावना । बैसला ध्याना विठ्ठल ॥ ध्रु० ॥
मीतूंपणा वोस ठाव । भरला सर्व विठ्ठल ॥ २ ॥
ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल । एका जनार्दनीं अवघा विठ्ठल ॥ ३ ॥

३०

भाव तोचि देव भाव तोचि देव । ये अर्थी संदेह धरूं नका ॥ १ ॥
भावें भक्ति फळे भावें देव मिळे । निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥ ध्रु० ॥
भावाचि कारण भावाचि कारण । यापरतें साधन नाहीं नाहीं ॥ २ ॥
एका जनार्दनीं भावाच्या आवडी । मनोरथ कोडी पुरती तेणें ॥ ३ ॥

३१

येथुनि पाहे तेथवरी । तंव तंव अवघा दिसे हरी ॥ १ ॥
आतां जाऊनि कोठें पाहूं । जेथें पाहूं तेथें देवूं ॥ ध्रु० ॥
गिरिकपाटीं कंदरीं । जिकडे पाहे तिकडे हरी ॥ २ ॥
एका बैसला निरंजनीं । जनार्दन जनीं वनीं ॥ ३ ॥

३२

भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा । अभिमान नित्य नवा तयामाजी ॥ १ ॥
प्रेमसुखं देई प्रेमसुख देई । प्रेमेंवीण नाहीं समाधान ॥ ध्रु० ॥
गांडवेनें जेविं शृंगारू पैं केला । प्रेमेंवीण झाला ज्ञानी तैसा ॥ २ ॥
एका जनार्दनीं प्रेम अति गोड । अनुभवी सुरवाड जाणतील ॥ ३ ॥

३३

गातो एका ध्यातो एका । अंतरबाहिर पाहतो एका ॥ १ ॥
अगुणी एका सगुणी एका । गुणातीत देखो एका ॥ ध्रु० ॥
जनीं एका वनीं एका । निरंजनीं देखो एका ॥ २ ॥
संतजनां पढिये एका । जनार्दना कडिये एका ॥ ३ ॥

---

१ शब्दशास्त्राच्या ज्ञानाबरोबर अहंकार वाढत मात्र असतो. २ प्रेमसुख.

३४

तुजबीण आम्हां काण आहे देवा । धांव यादवराया मायबापा ॥ १ ॥
पडिलोंसे डोहीं प्रपंच आवर्ती । कोण करी शांति तुजविण ! ॥ ध्रु० ॥
जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवीं दातारा मायबापा ॥ २ ॥
**एका जनार्दनीं** धांवे लवलाही । येवोनीयां हृदयीं ठाव देई ॥ ३ ॥

३५

सकळ देवांचा जनिता । त्रिगुणासत्ता चाळविता ॥ १ ॥
शरण जातां त्याच्या पायां । सर्व हारपली माया ॥ ध्रु० ॥
भेदाभेद निवारले । सर्व स्वरूप कोंदलें ॥ २ ॥
**एका जनार्दना** शिवें । जीवपणा मुकलों जीवें ॥ ३ ॥

श्रीतुकाराम. ( ३६–७७ ) ३६

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवूनीयां ॥ १ ॥
गळां तुळसीहार कांसे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि रूप ॥ ध्रु० ॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणी विराजीत ॥ २ ॥
**तुका** म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहिन श्रीमुख आवडीनें ॥ ३ ॥

३७

कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें झालें माझ्या जीवा । कधीं भेटसी केशवा ! ॥ ध्रु० ॥
चुकालिया माये । बाळ हुरूहुरू पाहे ॥ २ ॥
जीवनावेगळी मासोळी । **तुका** तैसा तळमळी ॥ ३ ॥

३८

शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ती । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
म्हणऊनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व झालें सांग नामें एका ॥ २ ॥

---

१ भोंवऱ्यांत. २ लवकर, तात्काळ. ३ ' गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ' ( गीता अ० १४ ) ४ शोभतात. ५ किती प्रेमळ भावना ही !

सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥ ३ ॥
**तुका** म्हणे आम्हीं विधीचे जनिते । स्वयंभू आईते केले नव्हों ॥ ४ ॥

३९

नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरें ॥ १ ॥
लागला उशीर पतीतपावना । विसरोनि वचना गेलासी या ॥ ध्रु० ॥
जाळोनि संसार बैसलों आंगणीं । तुझें नाहीं मनींमानसींही ॥ २ ॥
**तुका** म्हणे नको रागेजों विठ्ठला । उठीं देई मला भेटी आतां ॥ ३ ॥

४०

देखोनियां तूझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनीयां ॥ १ ॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ ध्रु० ॥
मुखें गातों गीत वाजवीतों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ २ ॥
**तुका** म्हणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ३ ॥

४१

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ॥ १ ॥
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसी हेंचि सांगे ॥ ध्रु० ॥
विटंबो शरीर होत कां विपत्ति । परी राहो चित्तीं नारायण ॥ २ ॥
**तुका** म्हणे नाशिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेची हित ॥ ३ ॥

४२

**तुजविण** वाणी आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥ १ ॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ ध्रु० ॥
नेत्रीं आणिकांसी पाहीन आवडी । जातु तोचि घडी चांडाळ हे ॥ २ ॥
कथामृतपान न करिती श्रवण । काय-प्रयोजन मग त्यांचें ॥ ३ ॥
**तुका** म्हणे काय वांचूनि कारण । तुज एक क्षण विसंबतां ! ॥ ४ ॥

---

१ आम्ही ब्रह्मदेवाचेही बाप अनादि आहोंत, निर्मिलेले नाहींत. २ " नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं. " ३ वर्णन करीं.

## ४३

घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
डोळे तुम्ही घ्यारे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ ध्रु० ॥
तुम्ही आईकारे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ २ ॥
मना तेथें धांव घेई । राहीं विठोबाचे पायीं ॥ ३ ॥
**तुका** म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ४ ॥

## ४४

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायणा तैशापरी ॥ १ ॥
सर्व भावें लोभ्या आवडे हें धन । आम्हां नारायण तैशापरी ॥ ध्रु० ॥
**तुका** म्हणे एकविध झालें मन । विठ्ठलावांचून नेणें दुजें ॥ २ ॥

## ४५

विठ्ठल आमुचें जीवन । आगमनिगमांचें स्थान ।
विठ्ठल सिद्धींचें साधन । विठ्ठल ध्यान विसांवा ॥ १ ॥
विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त ।
विठ्ठल पुण्यपुरुषार्थ । आवडे मात विठ्ठलाची ॥ २ ॥
विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तहि पाताळें भरूनी ।
विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा ।
विठ्ठल प्रेमाचा पूतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥
विठ्ठल बाप माय चुलता । विठल भगिनी भ्राता ।
विठ्ठलेंवीण चाड नाहीं गोता । **तुका** म्हणे आतां नाहीं दुसरें॥ ५ ॥

## ४६

मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोनि सांगो काई ।
आतां मज पायीं । ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥

पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ॥ २ ॥
अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग ।
धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां । तोडीं माझी अवघी चिंता ।
येउनियां पंढरिनाथा । वास करीं हृदयीं ॥ ४ ॥

४७

आगी लागो तया सुखा । जेणें हरी नये मुखा ॥ १ ॥
मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥ ध्रु० ॥
जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कूळ ॥ २ ॥
तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ३ ॥

४८

कां रे नाठविसी कृपाळू देवासी । पोंसितो जनासी एकला तो ॥ १ ॥
बाळा ! दूध कोण करितें उत्पत्ती । वाढवी[1] श्रीपती सवें दोन्ही ॥ ध्रु० ॥
फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ २ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनी ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर[2] । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ४ ॥

४९

ज्याचें जया ध्यान । तेंची होय त्याचें मन ॥ १ ॥
म्हणउनि अवघे सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ ध्रु० ॥
समखूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ २ ॥
तुका[3] म्हणे नभा— । परता अणूचाही गाभा ॥ ३ ॥

---

१ बाळाच्या वाढीबरोबर दुधाचीही वाढ होत असते. २ विश्वाचा पोषणकर्ता.
३ 'तुका म्हणे व्यापक नभा । होई अणूचाही गाभा.'

५०

गोविंद गोविंद । मना लागलीया छंद ॥ १ ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ ध्रु० ॥
आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ २ ॥
तुका म्हणे ओळी । जेवीं नुरेची वेगळी ॥ ३[1] ॥

५१

तुज पाहतां सामोरी । दृष्टी न फिरे माघारी ॥ १ ॥
माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरिराया ॥ ध्रु० ॥
नव्हे सारितां निराळें । लवण मेळवितां जळें ॥ २ ॥
तुका म्हणे बळी । जीव दिला पायातळीं ॥ ३ ॥

५२

पडतां जडभारी । दासें आठवावा हरी ॥ १ ॥
मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ ध्रु० ॥
नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ २ ॥
तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ३ ॥

५३

रूपीं गुंतले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥
देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ॥ ध्रु० ॥
कळों नये सुखदुःख । तान हारपली भूक ॥ २ ॥
तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ३ ॥

५४

बोलणेंचि नाहीं । आतां देवाविणें कांहीं ॥ १ ॥
एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ ध्रु० ॥

---

१ भिंगुरटी कीटकीतें धरी । कोंडी भिंती माजिलें घरीं ॥ ते मरणभयें ध्यान करी । निरंतरी भ्रमरीचें ॥ १ ॥ तेणें तीव्रध्यानें ती किटी । होऊनि ठाके भिंगरटी ॥ गगना चढे उठाउठीं । प्रत्यक्ष दृष्टी देखिजे ॥ २ ॥ ( एकनाथी भागवत; अ. ९. )

पाहेन ते पाय । जोंवरी हे दृष्टी धाय ॥ २ ॥
तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहणें ॥ ३ ॥

५५

वर्णावी ते थोरी एका विठलाची । कीर्ती मानवाची सांगों नये ॥ १ ॥
उदंडची झाले जन्मोनियां मेले । होवोनियां गेले राव रंक ॥ ध्रु० ॥
त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णिताती ॥ २ ॥
अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरणव्यथा दूर होती ॥४॥

५६

तूं माझी माउली तूं माझी साउली । पहातों वाटुली पांडुरंगे ॥ १ ॥
तूं मज एकला वडील धाकुला । तूं मज आपुला सोयरा जीव ॥ ध्रु० ॥
तुका म्हणे जीव तुजपासीं असे । तुजविण ओस सर्व दिशा ॥ २ ॥

५७

एक धरिला चित्तीं । आम्ही रखुमाईचा पती ॥ १ ॥
तेणें जालें अवघें काम । निवारीला भवभ्रम ॥ ध्रु० ॥
परद्रव्य परनारी । जाली विषाचीये परी ॥ २ ॥
तुका म्हणे फार । नाहीं लागला व्यवहारें ॥ ३ ॥

५८

माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ! ॥ १ ॥
आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साचं करीं ॥ २ ॥
वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रियांआधीन झालों देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे जैसातैसा तुझा दास । न धरी उदास मायबापा ॥ ४ ॥

---

१ वाट. २ खटपट, श्रम. ३ खरा. ४ कसाही असलों तरी तुझा दास आहे.

५९

धर्माची तूं मूर्ती । पापपुण्य तुझे हातीं ॥ १ ॥
मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ ध्रु० ॥
करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ २ ॥
जीवींच्या जीवना । तुका म्हणे नारायणा ॥ ३ ॥

६०

पावलें पावलें तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥
जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रिभुवन संचिलें विठ्ठला गा ॥ ध्रु० ॥
भेदाभेदमतें भ्रमाचे संवाद । आम्हां नको वाद त्यांसीं देऊं ॥ २ ॥
तुका म्हणे अणुं तुजविण नाहीं । नभाहूनी पाही वाडें आहे ॥ ३ ॥

६१

कई ऐसी दशा येइल माझ्या अंगा । चित्त पांडुरंगा झुरतसे ॥ १ ॥
नाठवूनि देह पायाचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मध्यें ॥ ध्रु० ॥
काई ऐसा पात्र होईन लाभासी ! । नेणों हृषीकेशी तुष्टतील ! ! ॥ २ ॥
तुका म्हणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥ ३ ॥

६२

अगा ये उदारा अगा विश्वंभरा । रखुमाईच्या वरा पांडुरं. ॥
अगा सर्वोत्तमा अगा कृपारामा । अगा मेघश्यामा विश्वजनित्या ॥ ध्रु० ॥
अगा कृपावंता जीवन तं दाता । अगा सर्व सत्ता धरितया ॥ २ ॥
अगा सर्वजाणा अगा नारायणा । करुणावचना चित्त द्यावें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं अधिकार तैसी । सरती पायांपाशीं केली मागें ॥ ४ ॥

६३

संसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥
म्हणऊनि तुझे आठविले पाये । ये वो माझे माये पांडुरंगे ॥ ध्रु० ॥
बहुता जन्मींचा झालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ २ ॥
वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारीं । कणव न करी कोणी माझी ॥ ३ ॥

---

१ ' अणोरणीयान्महतो महीयान् ' श्रोत. २ मोठा. ३ कींव, दया.

बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस झालों कासावीस ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां धांव घालीं वेगीं । ब्रीद तुझें जगीं ‘ दीननाथ ’॥ ५ ॥

६४

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमुचें त्या काई असे ओझें ? ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दूर । तया मुखीं चारा कोण घाली ? ॥ ध्रु० ॥
पक्षी अजगर न करिती संचित । तयांसि अनंत प्रतिपाळी ॥ २ ॥
तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ३ ॥

६५

नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव । मी भक्त तूं देव ऐसें करी ॥ १ ॥
दावीं रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणांवरी माथा ॥ ध्रु० ॥
पाहीन श्रीमुख देइन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥ २ ॥
पुसतां सांगेन हितगुजमात । बैसोनि एकांत सुखगोष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे यासी न लावी उशीर । माझें अभ्यंतर जाणोनीयां ॥ ४ ॥

६६

मोक्षपदें तुच्छ केलीं याकारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥
विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढतीपुढती आस सेवावें हें ॥ ध्रु० ॥
देवाहातीं रूप धरवूं आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ २ ॥
तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याईं तीं पाऊलें विटेवरी ॥ ३ ॥

६७

मागणें तें मागों देवा । करूं भक्ति त्याची सेवा ॥ १ ॥
काय उणें तयापाशीं । ऋद्धिसिद्धी ज्याच्या दासी ॥ ध्रु० ॥
काया वाचा मन । करूं देवा हें अर्पण ॥ २ ॥
तुका म्हणे विश्वंभर । ज्याच्यानें हें चराचर ॥ ३ ॥

६८

चाले हें शरीर कोणाचिये सत्तें ? । कोण बोलविते हरीवीण ? ॥ १ ॥
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचें भजन चकों नका ॥ ध्रु० ॥
मानसाची देव चालवी अहंता । मीचि एक कर्ता म्हणोनियां ॥ २ ॥
वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ? ॥ ३ ॥
तुका म्हणे विठो भरला सबाह्य । उणें काय आहे चराचरीं ? ॥ ४ ॥

६९

प्रेमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥ १ ॥
मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरिराया ॥ ध्रु० ॥
सकळ सत्ता तया हातीं । माझी कीव काकुळती ॥ २ ॥
तुका म्हणे ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे इच्छे ॥ ३ ॥

७०

दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजे नारायणा ॥ १ ॥
आतां मज ऐसें करी । तुझे पाय चित्तीं धरी ॥ ध्रु० ॥
उपजला भावो । तुझे कृपें सिद्धी जावो ॥ २ ॥
तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता ॥ ३ ॥

७१

हाकेसरशी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ॥ १ ॥
ऐसी कृपावंत कोण । माझे विठाईवांचून ॥ ध्रु० ॥
करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ २ ॥
तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ३ ॥

७२

काय तुझें वेंचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥
काय तुझें रूप घेतों मी चोरोनी । त्याभेणें लपोनी राहिलासी ॥ ध्रु० ॥

काय तुझें आम्हां करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥ २ ॥
तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परी आहे आवडी दर्शनाची ॥ ३ ॥

७३

आंत हरि बाहेर हरि । हरिनें घरीं कोंडिलें ॥ १ ॥
हरिनें कामा घातला चिरा । वित्तवरा मुकवलें ॥ ध्रु० ॥
हरिनें जीवें केली साटी । पाडिली तुटी सकळांसी ॥ २ ॥
तुका म्हणे वेगळा नव्हे । हरि भोंवे भोंवताला ॥ ३ ॥

७४

आणिक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासूनियां ॥ १ ॥
पांडुरंग ध्यांनीं पांडुरंग मनीं । जागृतीं स्वप्नीं पांडुरंग ॥ ध्रु० ॥
पडिलें वळण इंद्रियां सकळां । भाव तो निराळा नाहीं कोणा ॥ २ ॥
तुका म्हणे नेत्रीं केली वोळखण । तटस्थ तें ध्यान विटेवरी ॥ ३ ॥

७५

अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥
देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ ध्रु० ॥
आपुलीया वैभवें । श्रृंगारावें निर्मळें ॥ २ ॥
तुका म्हणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥ ३ ॥

७६

मोक्ष तुमचा देवा । तुम्हीं दुर्लभ तो ठेवा ॥ १ ॥
मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ ध्रु ॥
आपुल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥ २ ॥
तुका म्हणे भेटी । पुरे एकाचि शेवटीं ॥ ३ ॥

७७

निर्वाहापुरतें अन्नआच्छादन । आश्रमासी स्थान कोपी गुहा ॥ १ ॥
कोठेंही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांठवावा ॥ ध्रु० ॥

नये बोलों फार बैसों जनांमध्यें । सावधानबुद्धी इंद्रियें दमी ॥ २ ॥
तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणाची गोंवी[2] उगवूनी ॥ ३ ॥

श्रीरामदास ( ७८–९१ )

७८

राम आकाशीं पाताळीं । राम नांदे भूमंडळीं ॥
राम योगियांचे मेळीं । सर्वकाळीं तिष्ठत ॥ १ ॥
राम नित्यनिरंतरीं । राम सबाह्य अंतरीं ॥
राम विवेकाचे घरीं । भक्तीवरी सांपडे ॥ २ ॥
राम भावें ठायीं पडे । राम भक्तीशीं आंतुडे ॥
राम ऐक्यरूपीं जोडे । मौन पडे श्रुतींशीं ॥ ३ ॥
राम योग्याचें मंडण । राम भक्ताचें भूषण ॥
राम आनंदाचा घन । करी रक्षण दासाचें ॥ ४ ॥

७९

राम गावा राम ध्यावा । राम जीवींचा विसांवा ॥ १ ॥
कल्याणाचें जें कल्याण । रघुरायाचें गुणागान ॥ २ ॥
मंगळाचें जें मंगळ । राम कौसल्येचा बाळ ॥ ३ ॥
राम कैवल्याचा दानी । रामदासा अभिमानी ॥ ४ ॥

८०

दासाची संपत्ती राम सीतापती । जीवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥
राम एक माता राम एक पिता । राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥
सहोदर विद्या वैभव कांचन । सर्व हा स्वजन राम एक ॥ ३ ॥

---

१ ' अरतिर्जनसंसदि ' ( गीता अ. १३ ). २ गुंता. सत्व, रज, व तम या तीन गुणांचा गुंता सोडवून म्हणजे स्वस्वरूप त्रिगुणातीत आहे हें ओळखून. ' गुणानेतानतीत्य त्रीन् ' ( गीता अ. ) १४

राम एक स्वामी राम हा कैवारी । लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥
राम एक ज्ञान राम एक ध्यान । राम समाधान **रामदासीं** ॥ ५ ॥

८१

कां वो रामराये दुरी धरियेलें । कठिण कैसें जालें चित्त तुझें ? ॥ १ ॥
देउनी आलिंगन प्रीतिपडिभरें । कैं मुख पीतांबरें पुससील ? ॥ २ ॥
घेउनी कडिये धरुनी हनुवटी । कैं गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥
**रामदास** म्हणे केव्हां संबोखिसी । प्रेमपान्हा देशी जननीये ॥ ४ ॥

८२

अपराधी अपराधी । आम्हां नाहीं दृढबुद्धी ॥ १ ॥
माझे अन्याय अगणित । कोण करील गणित ॥ ध्रु० ॥
मज सर्वस्वें पाळावें । प्रतीतीनें सांभाळावें ॥ २ ॥
माझी वाईट करणी । **रामदास** लोटांगणी ॥ ३ ॥

८३

शिरीं आहे रामराज । औषधाचें कोण काज ॥ १ ॥
जो जो प्रयत्न रामावीण । तो तो दुःखासी कारण ॥ ध्रु० ॥
शंकराचें हळाहळ । जेणें केलें सुसीतळ ॥ २ ॥
आम्हां तोचि तो रक्षिता । **रामदासीं** नाहीं चिंता ॥ ३ ॥

८४

सोडीं संसाराची आस । धरीं भक्तीचा हव्यास ॥ १ ॥
दुःखमूळ हा संसार । तयामध्यें भक्ती सार ॥ ध्रु० ॥
ग्रंथ पाहतां लक्षकोटी । जेथें जेथें भक्ती मोठी ॥ २ ॥
जन्मा आलियाचें फळ । **दास** म्हणे तें केवळ ॥ ३ ॥

८५

बाळक जाणेना मातेसी । तिचें मन तयापासीं ॥ १ ॥
तैसा देव हा दयाळ । करी भक्ताचा सांभाळ ॥ ध्रु० ॥

धेनु वत्साचेनी लागें । धांवे त्याच्या मागें मागें ॥ २ ॥
पक्षी घेतसे गगन । पिल्यापाशीं त्याचें मन ॥ ३ ॥
मत्स्य[1] आठवितां पाळी । कूर्म दृष्टीनें सांभाळी ॥ ४ ॥
रामीं **रामदास** म्हणे । मायाजाळाचीं लक्षणें ॥ ५ ॥

८६

हरिभक्ति करी धन्य तो संसारी । जयाचा कैवारी देवराणा ॥ १ ॥
देवराणा सदा सर्वदा मस्तकीं । तयासी या लोकीं चाड[2] नाहीं ॥ ध्रु० ॥
चाड नाहीं जनीं राघवाचा दास । सार्थक वयस **रामदासीं** ॥ २ ॥

८७

देव जवळी अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ १ ॥
मूर्ति त्रैलोक्यीं संचली । दृष्टि विश्वाची चुकली ॥ २ ॥
भाग्य आलें संतजन । झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥
**रामदासीं** योग झाला । देहीं देव प्रगटला ॥ ४ ॥

८८

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु० ॥
मन हें चंचळ न राहे निश्चळ । निरूपणीं पळ स्थिरावेना ॥ १ ॥
सांडूनियां ध्यान विषयचिंतन । करितसे मन आवरेना ॥ २ ॥
**रामदास** म्हणे कथानिरूपणें । मनाचीं लक्षणें जैसीं तैसीं ! ॥ ३ ॥

८९

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु० ॥
वैराग्याचा लेश नाहीं माझे अंगीं । बोलतसें जगीं शब्दज्ञान ॥ १ ॥
देह हें कारणीं लावावें नावडे । आळस आवडे सर्वकाळ ॥ २ ॥
**रामदास** म्हणे लाज तुझी तुज । कोण पुसे मज अनाथासी ॥ ३ ॥

---

१ मत्स्यी स्मरणानें व कांसवी दृष्टीनें आपल्या पोरांना पोसते. २ आवड, पर्वा.

९०

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु० ॥
मिथ्या–शब्दज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाचे ॥ १ ॥
सदा खळबळ निर्गुणाची घडे । सगुण नावडे ज्ञानगर्वें ॥ २ ॥
**रामदास** म्हणे ऐसा हा पतित । मीपणें अनंत पाहों जातां ॥ ३ ॥

९१

मी खरा पतीत तूं खरा पावन । आतां अनुमान करूं नको ॥ ध्रु० ॥
आतां मज कांहीं माझी चिंता नसे । तुझें नाम कैसें वांचईल ? ॥ १ ॥
समर्थें घेतला नांवालागीं भार । मज उपकार कासयाचा ॥ २ ॥
**रामदास** म्हणे तुझें तुज उणे । सोईरीं पिसुणें हांसतील ॥ ३ ॥

शेखमहंमद ( ९२ )

९२

ऐसें केलें या गोपाळें । नाहीं सोंवळें ओंवळें ॥ १ ॥
फांटे केतकीच्या झाडा । आंत जन्मला केवडा ॥ २ ॥
फणसाअंगीं कांटे । आंत अमृताचे सांठे ॥ ३ ॥
नारळ वरुता कठिण । परी अंतरीं जीवन ॥ ४ ॥
**शेखमहंमद** अविंध । त्याचे हृदयीं गोविंद ॥ ६ ॥

चोखामेळा ( ९३–९४ )

९३

ऊस डोंगा परी रस नोहे डोंगा । काय भुललासी वरलिया रंगा ॥ १ ॥
कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा । काय० ॥ २ ॥
नदी डोंगी परी जळ नोहे डोंगें । काय० रंगें ॥ ३ ॥
**चोखा** डोंगा परी भाव नोहे डोंगा । काय० ॥ ४ ॥

९४

टाळी वाजवावी गुढी उभारावी । वाट हे चालावी पंढरीची ॥ १ ॥
पताकांचे भार मिळाले अपार । होतो जयजकार भीमातीरीं ॥ २ ॥

---

१ वाईट, हीन.

हरिनाम गर्जतां नाहीं भयचिंता । ऐसी बोले गीता भागवत ॥ ३ ॥
खटनट यावे शुद्ध होऊन जावे । दवंडी पिटी भावें **चोखामळा** ॥ ४ ॥

निळोबाराय ( ९५ ) ९५

पाचारितां यावें बोळवितां जावें । हें तों न संभवे तुम्हांपाशीं ॥ १ ॥
जेथील तेथेंचि प्रगटाल रूपडें । आपुल्या सुरवाडें भक्तांचिया ॥ २ ॥
जाणें येणें नाहीं तुम्हां कदाकाळीं । असा भूमंडळीं व्यापूनियां ॥ ३ ॥
**निळा** म्हणे ऐसें जाणोनियां मनीं । करितों अनुदिनीं स्तवन तुमचें ॥४॥

कृष्णदयार्णव ( ९६ ) ९६

गोविंदा तूं जळ मी तेथें कल्लोळ । असों सर्वकाळ ऐक्यसुखें ॥ १ ॥
तूं बिंब मी तेज तूं हेतु मी काज । व्यापक तूं पूज्य पूजक मी ॥ २ ॥
अणूचा वियोग नसे तुम्हां आम्हां । आजी मेघश्यामा सांडूं नको ॥ ३ ॥
तूं रस मी गोडी तूं वृक्ष मी वाढी । तूं शक्ति मी प्रौढी सामर्थ्याची ॥ ४ ॥
**दयार्णवस्वामी** मी तुझा सेवक । वियोगाचें दुःख साहों नेणें ॥ ५ ॥

वासुदेवानंदसरस्वती ( ९७ ) ९७

भावभक्ती अंगीं उठे । प्रेमभरें कंठ दाटे ॥ १ ॥
दाटे प्रेमाश्रू लोचनीं । रोम राहे उभारूनी ॥ २ ॥
उठोनियां आलिंगाया । आतां जातां नये पाया ॥ ३ ॥
पायां पडुनि स्तवूं जरी । तरी शब्द नुमटे हरी ॥ ४ ॥
हरिलें त्वां देहभान । आतां कोणा करूं नमन ॥ ५ ॥
जनं दत्तरूप होतां । **वासुदेवा** ये धन्यता ॥ ६ ॥

---

ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं
तीर्थास्पदं शिवविरिंचिनुतं शरण्यम् ।
भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं
वंदे महापुरुष ते चरणारविंदम् ॥ ३३ ॥

श्रीमद्भागवत स्कंद ११ अ. ५.

---

# ३ पदें.

कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना ।
विनाऽऽनंदाश्रुकलया शुद्ध्येत् भक्त्याविनाऽऽशयः ॥ २३ ॥
वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं । रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ।
विलज्ज उद्गायति नृत्यते च । मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥२४॥
—श्रीमद्भागवत ११–१४.

श्रीज्ञानेश्वर ( १ ) **१**

अनुमानेना अनुमानेना । श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे ॥ ध्रु० ॥
तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे । सगुण निर्गुण एक गोविंदु रे ॥ १ ॥
तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे । स्थूळ सूक्ष्म एक गोविंदु रे ॥ २ ॥
तुज साकार म्हणों कीं निराकार । रे साकार निराकार एक गोविंदु रे ॥३॥
तुज दृश्य म्हणों कीं अदृश्य रे । दृश्यादृश्य एक गोविंदु रे ॥ ४ ॥
निवृत्तिप्रसादें ज्ञानदेव बोले । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु रे ॥ ५ ॥

श्रीएकनाथ ( २–४ ) **२**

तें मन निष्ठुर कां केलें । जें पूर्ण दयेनें भरलें ॥ ध्रु० ॥
गजेंद्राचे हांकेसरिसें । धांवुनियां आलें ॥ १ ॥
प्रल्हादाच्या भावार्थासी । स्तंभीं गुरगुरलें ॥ २ ॥
पाचाळीच्या करुणावचनें । कळवळुनी[1] आलें ॥ ३ ॥
एका जनार्दनपूर्णकृपेनें । निशिदिनिं पदिं रमलें ॥ ४ ॥

**३**

सगुणचरित्रें परम पवित्रें हरिचीं वर्णावीं ।
सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ ध्रु० ॥
संतसंगें अंतररंगें नाम बोलावें ।
कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें ॥ १ ॥

---

१. चित्त भगवद्भक्तीनें रंगवून.

भक्तिज्ञानविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।
प्रेमभरें बा ! वैराग्याच्या युक्ती विवराव्या ॥ २ ॥
जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची ।
ऐसी कीर्तनमर्यादा ही संतांचे घरची ॥ ३ ॥
अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करताळी ।
**एका जनार्दनीं** मुक्ति होय तात्काळीं ॥ ४ ॥

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें हो ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो ॥ ध्रु० ॥
आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें हो ।
क्रिया कर्म धर्म अवघें येणेंचि प्रकाशे हो ।
सत्य-मिथ्याप्रकृतिपर अवघा रामचि भासे हो ॥ १ ॥
चित्तचि हारपलें अवघें चैतन्य जाहलें हो ।
देखतां देखतां अवघें विश्व मावळलें हो ।
पाहतां पाहणें अवघें द्वैतभाव निमालें हो ॥ २ ॥
भक्ति ज्ञान वैराग्य लागे सहज आत्मस्थिती हो ।
निर्धारितां रामरूपीं जडलीसे प्रीती हो ।
**एकाजनार्दनीं** अवघा रामचि आदिअंतीं हो ॥ ३ ॥

श्रीनामदेव ( ५ ) ५

पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा ।
पतीतपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥ ध्रु० ॥
सोडीं देवा ! ब्रीद आतां न होसि अभिमानी ।
पतीतपावन नाम तुजला ठेवियलें कोणी ॥ १ ॥

---

१ देव व भक्त यांचें ऐक्य भावून.

घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदार ।
काय देवा ! रोधूं तुमचें कृपणाचें दार ॥ २ ॥
उच्छिष्टाचें शीत देवा न टाकिसी बाहेरी ।
कोणीं दिधली भगवंत तुजला भूषणाची थोरी ! ॥ ३ ॥
**नामा** म्हणे बा तुमचें नलगे मज कांहीं ।
प्रेम असों या हृदयीं तुमचे आठवीन पाईं ॥ ४ ॥

श्रीरामदास ( ६ ) **६**

आम्ही काय कुणाचें खातों रे। तो राम आम्हांला देतो रे ॥ ध्रु० ॥
बांधिले घुमट किल्ल्याचे तट । तयाला फुटती पिंपळवट ।
तेथें कोण लावितो मोट । बुडाला पाणि घालीतो ? ॥ १ ॥
खडक फोडितां सजिव रोडकी । पाहिली सर्वांनीं बेडकी ।
सिंधु नसतां तियेचे मुखीं । पाणी कोण घालीतो ? ॥ २ ॥
पहा रे पहा मातेचीये स्तनीं । चिंतितां रक्तमांसमलखाणी ।
तिथें विमल दुग्ध घालोनी । कोण पोसीतो ? ॥ ३ ॥
नसतां पाण्याचे बुडबुडे । सदासर्वदा गगन कोरडें ।
**दास** म्हणे जीवन चहुंकडे । पाडुनी सडे पीक उगवीतो ? ॥ ४ ॥

आनंदतनय ( ७ ) **७**

कां रे नाठविसी कमलनयन वासुदेव ॥ ध्रु० ॥
जपाति जया संतसनक । सकळजना जननिजनक ॥ कां रे० ॥ १ ॥
कलुषहरण विमलचरित । करुनि निजानंदभरित ॥ कां रे० ॥ २ ॥
विचरे **आनंदतनय** । हृदयिं धरुनि नंदतनय ॥ कां रे० ॥ ३ ॥

---

१ सर्व जीवभाव हरण करितोस तेव्हां स्वस्वरूप देतोस. २ ऐश्वर्यवंत अशी. ३ हें सुंदर पद 'मी समर्थांच्या मठांतले त्यांचे शिष्य पोसतों' म्हणून शिवरायाला अहंकार झाला होता तो घालविण्याकरितां समर्थांनीं त्यास रानांत नेऊन 'खडक फोडून सजीव बेडकी' दाखविली तेव्हां रचिलें आहे, चारही दृष्टांत सृष्टींतले समर्पक असल्यामुळें या पदाला अपूर्व गोडी आली आहे. ४ विचार करितां.

केशवस्वामी ( ८–१९ ) ८

धांव विभो करुणाकर माधव देव दयानिधे देवकिनंदन ॥ ध्रु० ॥
हे करुणाकर दीनजनोद्धर हा भव दुस्तर यांतुनि उद्धर ॥ १ ॥
काममदादिक गांजिति हे अति धांव रमापति सेवकहितकर ॥ २ ॥
जननमरणभय हरण करि त्वरें । चरणीं शरण तव **केशव किंकर** ॥ ३ ॥

९

तोंवरि निजसुख नाहीं रे ऐसें कळलें पाहीं रे ॥ ध्रु० ॥
संतसमागम जोडेना । संशयमंडप मोडेना ॥ १ ॥
गुणमयरजनी नासेना । बोधतमारी प्रकाशेना ॥ २ ॥
**केशवस्वामी** भेटेना । सबाह्यांतरीं दाटेना ॥ ३ ॥

१०

घडि घडि घडि चरण तुझे आठवती रामा ॥ ध्रु० ॥
हीन दीन, आस तुझी पूर्णकाम ! आम्हां ॥ १ ॥
मात तात भ्रात नाथ तूंचि एक पाहीं ॥ २ ॥
**केशव** म्हणे करि दया शरण तुझे पायीं ॥ ३ ॥

रंगनाथस्वामी ( ११ ) ११

कळीं आली मांव रे । भक्तीपाशीं देव रे ! ।
न पाहेची याती, कूळ, । कर्म मूळ भाव रे ! ॥ ध्रु० ॥
कोण पुण्यश्लोक रे । गोकुळींचे लोक[3] रे ।
गोपवेषें जया घरीं । ब्रह्मांडनायक रे ! ॥ १ ॥
दुर्लभ ब्रह्मादिकां । त्यासी गोपी बायका ।
हर्षे नाचवीती । वाजवूनी करताळिका ॥ २ ॥

---

१ सत्त्व, , तम या त्रिगुणांच्या कर्दमापासून सारें जग झालें आहे. या तीनही गुणांना मागें टाकून श्रीकृष्णानें अर्जुनास बोधिल्याप्रमाणें निस्त्रैगुण्य झाल्याविना 'अहमात्मा' ह्या बोधसूर्याचा उदय होणार नाहीं व असें झाल्याविना आत्मसुख नाहीं. २ माया, कपट. ३ पुण्यवंत गवळी.

प्राणाच्या निरोधनें । नव्हे साध्य साधनें ।
लीलारूपविग्रही तो । चारिताहे गोधनें ॥ ३ ॥
भाविकांचा बंधं रे । तोडी जगद्वंद्य रे ! ।
यशोदेनें ऊखळीं तो । बांधिला गोविंद रे ॥ ४ ॥
ज्याचा जैसा हेत रे । तया तैसा होत रे ! ।
निजानंदीं पूर्णरंगीं । रंगला अनंत रे ! ॥ ५ ॥

वामनपंडित ( १२ )

## १२

अर्जुना तूं जाग रे ! होसी बा सुजाण रे ! ।
विश्व नाहीं, मीचि आहें, सखया ! तुझी आण रे ! ॥ ध्रु० ॥
मातीमाजीं घट रे ! । तंतूमाजीं पट रे ! ।
माती तंतू विचारितां कैंचा घट पट रे ! ॥ १ ॥
मिथ्या सोन्यामाजी रे । अलंकार साजिरे ? ।
तैसें विश्व मजमाजीं सांगतों हें आजि रे ? ॥ २ ॥
रज्जू सर्पाकार रे । सर्प ना,तो दोर रे ।
सर्प तोही दोरामाजी वांझेचें तें पोर रे ॥ ३ ॥
हेमीं अलंकार रे । पाण्याची ते गार रे ।
हेम पाणी पाहूं जातां कैंचा तो आकार रे ॥ ४ ॥
तैसें जग हें पाहीं रे ! । जंव रांमीं दृष्टी नाहीं रे ! ।
रामीं राम झाल्या मग जग कैंचें काय रे ॥ ५ ॥
अंडें कोटी खर्व रे ! । मजमाजी सर्व रे ! ।
न मी त्यांत न तीं मजमध्यें हें अपूर्व रे ! ॥ ६ ॥
राजविद्या गूज रे ! । सांगतसें तूज रे ! ।
कलीमाजी **वामनासी** हेंचि देणें मज रे ! ॥ ७ ॥

---

१. योगाभ्यासानें जो साध्य नाहीं तो लीलादेहधारी परमात्मा गुरें राखतो । २ भवबंध तोडितो. ३ हें सुंदर पद ' मया ततमिदं सर्वं ' ( गीता अ० ९ ) या श्लोकाधारें केलें आहे असें दिसतें.

प्रल्हादबुवा बडवे ( १३ )　　१३

देवा न लगे तुमचें कांहीं हो । चंचळ हें मन निश्चळ होऊनि
विनटो तुमचे पायीं हो ॥ ध्रु० ॥
न लगे गृहधन सुतदारा मज इंद्रपदादि कदाही हो ।
तव पदपंकजभजनेंविण मज सर्वहि ते आपदाही हो ॥ १ ॥
देशी वर जरि तरि तूं आतां याचि स्वरूपें राहीं हो ।
यावच्चंद्रदिवाकर येथुनि कोठेंही नव जाई हो ॥ २ ॥
दर्शनमात्रें जड मूढ पापी निजपदवी त्यां देई हो ।
**शिवतनय** तव दीन-तयाचे हृदयमंदिरा येई हो ॥ ३ ॥

बोधलेबोवा ( १४ )　　१४

सांगड बांधा रे भक्तीची । रघुनाथनामाची ॥ ध्रु० ॥
संसार सागर सागर । भरला जातो पूर ॥ १ ॥
लाटा उसळती विषयांच्या । बहुत प्रपंचाच्या ॥ २ ॥
नरहरि **बोधला** बोधिला । हरिनामीं रंगला ॥ ३ ॥

मध्वमुनीश्वर ( १५ )　　१५

तूं माझा यजमान ॥ रामा ॥ ध्रु० ॥
जननीजठरीं रक्षियलें मज । पोसुनि पंचाहि प्राण ॥ रामा० ॥ १ ॥
बाहिर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ रामा० ॥ २ ॥
ऐसें असतां या पोटाची । कां करूं चिंता जाण ॥ रामा० ॥ ३ ॥
**मध्वमुनीश्वर**स्वामी रमापति । धरि माझा अभिमान ॥ रामा० ॥ ४ ॥

कोकिळ ( १६ )　　१६

केला राम धणी । अगणित ज्याची करणी ॥ ध्रु० ॥
रामीं रतली वाणी । आतां सुखासि नाहीं हाणी ॥ केला० ॥ १ ॥

---

१ आपत्ति. हरीवांचून सर्व आनुकूल्य असूनही तें आपत्तिरूपच आहे.
२ ' येरवीं माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ? ॥ १ ॥ ( निश्वर. )

रामावांचुनि कांहीं । आणिक साधन उरलें नाहीं ॥ केला० ॥ २ ॥
कोकिळप्रभुसी ध्यातां । सहजचि निजपद आलें हातां ॥ केला० ॥ ३ ॥

अमृतराय ( १७–१८ ) १७

स्मरतां नित्य हरी । मग ती माया काय करी ? ॥ ध्रु० ॥
श्रवणें नमनें अद्वयवचनें । पळतो काळ दुरी ॥ १ ॥
करुणाकर वरदायक हरि जो । ठेवित हात शिरीं ॥ २ ॥
तोचि निरंतर उद्धवचरणीं । अमृतपान करी ॥ ३ ॥

१८

हरि मज कसा करिल भवपार ॥ ध्रु० ॥
तन मन धन विषयावरि वळतें । भजनीं आळस फार ॥ १ ॥
स्वात्मबुद्धि विचारुनि पाहीं । कोणि न केला उपकार ॥ २ ॥
अमृत म्हणे तुम्ही भजा निरंतर । श्रीधरगुरुचे पाय ॥ ३ ॥

सोहिरोबा ( १९–२० ) १९

हरिस्मरणविस्मरण तरि तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥
स्वार्थचि साधिसि सार्थक नेणासि । कोणासि पहा तरि पुसून ।
पुढें नाहीं गति मळिण जाली मति । साधुचि संगति नसून ॥ १ ॥
रतीविलासीं लंपट होसी । मानस गेलें डसून ।
लवकर सर कीं पडशिल नरकीं । फुकट मरशिल कुसून ॥ २ ॥
आळशि कामा उगा रिकामा । थट्टाचि[1] करिसी बसून ।
कुकर्मांच्या कांहीं वर्मांच्या[2] । गोष्टी सांगसि किसून ॥ ३ ॥
शरीर फिरवी तुजला मिरवी । देव असे रे रुसून ।
जवळि असून तुझे हृदयीं बसून । भगवंत नये रे दिसून ॥ ४ ॥
म्हणे सोहिरा गुरूनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून ।
जनांसि उद्धरावयाकारणें । वचन सांगतो ठसून ॥ ५ ॥

---

१ फाजीलपणाच्या गोष्टी. २ दुसऱ्यांच्या पापकर्मांच्या व वर्मांच्या गोष्टी मात्र उत्साहानें सांगतोस आणि हरिस्मरणाचें तुला विस्मरण पडतें !

२०

हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ॥ ध्रु० ॥
दोरिच्या सापा भिउनि भवा । भेटि नाहीं जिवा शिवा ।
अंतरिंचा ज्ञानदिवा । मालवूं नको रे ॥ १ ॥
विवेकाची ठरेल ओल । ऐसे बोलावे कीं बोल ।
आपुले मतें उगिच चिखल । कालवूं नको रे ॥ २ ॥
संतसंगतीनें उमज । आणुनि मनीं पुरतें समज ।
अनुभवावीण मान । हालवूं नको रे ॥ ३ ॥
सोहिरा म्हणे ज्ञानज्योति । तेथें कैंचि दिवसराती ।
तयाविणें नेत्रपाती । हालवूं नको रे ॥ ४ ॥

गिरिधर ( २१ )

२१

भक्तीं आकळिला । दयाघन भक्तीं आकळिला ॥ ध्रु० ॥
पार्थरथीं सारथ्य करी जो । निजपद दे बाळिला ॥ १ ॥
प्रऱ्हादास्तव प्रकटुनि स्तंभीं । दानव निर्दळिला ॥ २ ॥
रुक्मिणिनें एक्या तुळसिदळानें । गिरिधरप्रभु तुळिला ॥ ३ ॥

अनामी ( २२–२३ )

२२

धांव पाव सांवळे विठाबाई । कां मनिं धरिली अढी ।
अनाथ मी अपराधी स्मरतां उतरा पैलथडी ॥ विठोबा कां मनिं ॥ ध्रु० ॥
एकनाथाघरिं पाणि वाहिलें गंगेच्या कावडी ।
कबिराचे ते शेले विणुनी त्यांची घालिसि घडी ॥ कां हो० ॥ १ ॥
सांवतामाळ्याची भाजी खुडुनी त्याची बांधिसि जुडी ।
नरसीमेहेत्याची हुंडि पटवुनी त्याचा झालासी गडी ॥ कां० ॥ २ ॥

---

१ राग, अबोला. २ भावाचा भुकेला भगवान् भक्तांच्या घरीं सेवकासारखा राबतो, त्यांच्या नित्याच्या कामांतही त्यांना जातीनें साह्य करितो हें तत्त्व उदाहरणांसह या प्रेमळ पदांत सांगितलें आहे.

जनाबाईचीं लुगडीं धुतलीं चंद्रभागेच्या थडी ।
सजनकसाई मांस विकीतो त्याची लाविसि घडी ॥ कां० ॥ ३ ॥
दामाजीपंताचे वेळीं झाला महार तांतडी ।
पायीं वहाणा हातीं काठी खांद्यावर घोंगडी ॥ कां० ॥ ४ ॥
चोखामेळ्याचे घरीं येउनी ओढिसि ढोरें तांतडी ।
त्याची स्त्री बहु हांका मारी कोठें दिघली दडी ॥ कां० ॥ ५ ॥
गजेंद्राचा धांवा ऐकुनी वेगें घालिसी उडी ।
अर्जुनरथिं सारथ्य करूनी फेडी त्याची सांकडी ॥ कां० ॥ ६ ॥

२३

भक्तांचीया काजासाठीं । साधूंचीया प्रेमासाठीं ।
सोडिली मीं लाज रे ॥ ध्रु० ॥
दुर्योधनसदनीं गेलों । विदुराच्या गृहा आलों ।
आवडीनें कण्या प्यालों । जोंधळ्याची पेज रे ॥ भक्तां० ॥ १ ॥
धुतों अर्जुनाचे घोडे । सदा राह मागें पुढें ।
धर्मगृहीं काढिं उच्छिष्टें । बांधूनीयां माज रे । भक्तां० ॥ २ ॥
वेडीं गौळियांचीं पोरें । त्यांचें ताकप्यालों बा रे ।
खातां भिल्लिणीचीं बोरें । उच्छिष्टाची चोज रे ॥ भक्तां० ॥ ३ ॥

देवनाथ ( २४ )

२४

पार्था ते तरले ते तरले । जे नामीं अनुसरले ॥ ध्रु० ॥
वैराग्यें गरगरले । जे चित्सुखांत कीं तरतरले ॥ १ ॥
शांतिसुखें आभरले । जैसें लवण जळीं कीं विरलें ॥ २ ॥
देवनाथिं मन मुरलें । स्वरूपब्रह्म दिठीं जग भरलें ॥ ३ ॥

महादेव ( २५ )

२५

जयजय दत्तराज योगी । जय जय महाराज योगी ॥ ध्रु० ॥
शैलीशृंगी कंथा झोली, विभूत लगाया तनमो ।
कोटिचंद्रमातेज झुलत है, चलो आपने गतमो ॥ १ ॥

---

१ संकटें. ह्या व पुढील पदाचा कर्ता कोण ? २ कंबर, काचा घालून.

शंखचक्र और त्रिशुल बिराजे, गले बडी बनमाला ।
जोगदंड अवदूत दिगंबर, बनारस–रहनेवाला ॥ २ ॥
कृपा करो हम दीन रंक है, ले जाव आपनी माया ।
**महादेवसुत** ध्यान धरत है जब, तबही दर्शन पाया ॥ ३ ॥

नारायणबुवा ( २६ ) **२६**

हा परम सनातन विश्व भरुनि उरला ।
गुरु दत्तराज ऋषिकुळांत अवतरला ॥ ध्रु० ॥
स्मित रम्य वदन काषायवसनधारी ।
पायूष्युक्त करिं रत्नजडित झारी ।
निजभक्तत्राणकारणीं शूल धरिला ॥ गुरु० ॥ १ ॥
बांधिला कोप मुरडून जटामुकुटीं ।
घातली दयावनमाला दिव्यकंठीं ।
करधृत डमरूतुनि उपजति ज्ञानकला ॥ गुरु० ॥ २ ॥
मृगचर्म पांघरीं शंखचक्र हातीं ।
श्रुति श्वानरूप होऊनि पुढें पळती ।
भूधेनु कलिभयें चाटित चरणाला ॥ गुरु० ॥ ३ ॥
करि स्वजनउपाधी–भस्मलेप अंगा ।
झोळींत भरी तज्जन्ममरणपिंगा ।
**नारायण**–हृदयीं रंग भरुनि गेला ॥ गुरु० ॥ ४ ॥

रामजोशी ( २७ ) **२७**

भज भज भव-जलधिमाजि । मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥
धरिशिल दृढ चरणकमल । घडिभरि तरि करुनि विमल ।
तरिच सकल पाप शमल । त्यज रे भवाला ॥ १ ॥
सांडुनियां विषयवमन । झडकरि करि षडरिदमन ।
पूजिं मन हें करुनि सुमन । गिरिजाधवाला ॥ २ ॥
सावध हो करिसि काय । शंकर गुरु बाप माय ।
चिंतुनि **कविराय** पाय । हृदयीं निवाला ॥ ३ ॥

गोविंदसुवा ( २८ ) **२८**

अस धरी छंद । जाय तुटोनियां भवबंध ॥ ध्रु० ॥
छंद लागला टिटवीला । तिनें समुद्रही शोषिला ।
मैनावतिनें कृतार्थ केला । गोपीचंद ॥ जाय० ॥ १ ॥
दुधाचा सागर उपमन्यूला । अढळ पदावरि तो ध्रुव बसला ।
मार्कंडेयें यम हटवीला । झाला मंद ॥ २ ॥
झाले तीन देह भरताला । रावण रामरूप तो झाला ।
गोपी चढल्या गोलोकाला । यशोदानंद ॥ ३ ॥
आळीस भ्रमराचा अध्यास । होतां भ्रमरपणा ये तीस ।
तैसा सोडुनि जीवपणास । भोगी आनंद ॥ ४ ॥
छंदें असाध्य ही साधिती । नर ते नारायणही होती ।
**दीनजन** हरि आपुला करिती । जो सुखकंद ॥ ५ ॥

विठोबाअण्णा कऱ्हाडकर ( २९–३२ ) **२९**

रत रे रत सखया ! राघवनामीं । किति रमशिल कामीं[1] ? ।
रामनाम सुखधाम निरंतर । सेवुनियां त्यज कुमति रिकामी ॥ ध्रु० ॥
नानाजन्मार्जित दुरितें जळलीं । कृतपुण्यें फळलीं ।
तइं या नरतनुची प्राप्ती कळली । मग मति कां चळली ? ।
लाज लाज, करि काज स्मरुनि । रघुराजपद, विरम धनसुतधामीं ॥ १ ॥
दारादि विषयांचा भ्रमकृत वारा । समजुनि मनिं थारा ।
सारा मायिकाचि मोहपसारा । सारा निःसारा ।
इष्टमित्र कुळगोत्र पुत्र सर्वथा । वृथा भ्रम काकी मामी ॥ २ ॥
करण[2] सत्संगें गतमळ[3] करणें । शुद्धांतःकरणें ।
स्मरणें हित वरणें, संसृति तरणें । सत्कर्माचरणें ।
समज करुनि हित उमज मनिं । देशिकवचनें[4] कवण कसा मी ॥ ३ ॥

---

१ धन, पुत्र व गृह यांच्याठायीं रमूं नकोस; आसक्त होऊं नकोस. २ इंद्रियें. ३ पापरहित. ४ गुरूचा उपदेश ध्यानीं धरून.

ऐशा साधनेंचि बहुजन तरले । शांतीनें वरले ।
सहज देहत्वापासुनि सरले । निजपदिं अनुसरले ।
करिसि भजन तरि तरिसि पितरांसह । येविषयीं तुज विठ्ठल हामी ॥ ४ ॥

३०

श्रीरंगा, दे मजला सत्संगा आलों शरण तुला ॥ १ ॥
रघुनाथा, आवडो तव गुणगाथा आ० ॥ २ ॥
गोविंदा, सोडविं विषयच्छंदा आ० ॥ ३ ॥
स्वानंदा, विसरविं विषयच्छंदा आ० ॥ ४ ॥
श्रीकृष्णा, दूर करीं धनतृष्णा आ० ॥ ५ ॥
रघुराया, आवरीं आपुली माया आ० ॥ ६ ॥
गोपाळा, उघडीं चिन्मयडोळा आ० ॥ ७ ॥
श्रीरामा, दे मज भजन-प्रेमा आ० ॥ ८ ॥
घनश्यामा, नेई मज निजधामा आ० ॥ ९ ॥
भगवंता, तारीं विठ्ठलपंता आ० ॥ १० ॥

३१

रामकृष्ण नरहरे स्वामिन् रामकृष्ण नरहरे ।
कधिं करिशिल बा दया दयाळा ! गर्भवास हा पुरे ॥ ध्रु० ॥
काय करूं मी बरें सांगं । काय० ॥
कळों येति मज माझे गुणदोष । चित्त परी नावरे ॥ १ ॥
विषयीं मन नावरे सदोदित । विषयीं० ॥
कामक्रोध हे चोर लुटिति मज प्राण हाति घाबरे ॥ २ ॥
धांव धांव धांवरे सत्वर । धांव० ॥
बुडतो भवसागरीं दीन हा उद्धरिं आपुल्या करें ॥ ३ ॥
विचार मज न स्फुरे कांहीं । विचार० ॥
केविं गती होईल म्हणुनियां जीव अंतरीं झुरे । ४ ॥
प्रार्थितसें आदरें आतां एक । प्रार्थितसें० ॥
असें करीं तव नाम निरंतर पंतविठ्ठल स्मरे ॥ ५ ॥

३२

उत्तम जन्मा येउनि रामा ! गेलों मी वायां ।
दुष्ट पातकी शरण मी आलों सत्वर तव पायां ॥ ध्रु० ॥
आधीं चुकलों मुकलों मी निजवेदस्वाध्याया ।
कर्मे श्रौतस्मार्त न घडलीं सद्गति साधाया ।
पुराण परिसुनि सादर झालों यशहि न तव गाया ।
स्वस्थपणें कधिं नाहीं फावलें तुजला पूजाया ॥ उ० ॥ १ ॥
आर्जविलें बहु लवणभंजनें व्याह्या जांवाया ।
क्षुधित अतिथि कधिं नाहीं घेतला प्रेमें जेवाया ।
उदार कर कधीं केला नाहीं पैसा एक द्याया ।
नाम फुकटचें तेंहि न आलें स्वामी ! वदना या ॥ उ० ॥ २ ॥
कपट करुनियां निपट भोंदिल्या बहुत आयाबाया ।
केली धनगृहक्षेत्रस्त्रीपशुशिशुवर बहु माया ।
नित्य सजविली वसनभूषणें निंद्या ही काया ।
सिद्ध ठेविली सदाहि रसना सज्जन निंदाया ॥ उ० ॥ ३ ॥
वटवट निशिदिनिं केली चहुंकडे मन हें रमवाया ।
केलें स्नान न संध्या जपतप दुष्कृत शमवाया ।
क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ।
सद्यःकामुक झालों पाहुनि परधन परजाया ॥ उ० ॥ ४ ॥
नाहीं विद्या कला कुशलता तुजला रिझवाया ।
शुद्ध मधुर वाणीही नाहीं तुजला विनवाया ।
बुद्धिही नाहीं न कळे कांहीं शरणागत व्हाया ।
थकलिं मजल सर्वथा दयाळा स्वहित आचराया ॥ उ० ॥ ५ ॥
'हरि कनवाळू करि दीनावरि करुणेचि छाया' ।
निगमनगारा गर्जे ऐसा निखिला कळवाया ।
यावरि विश्वासुनियां आलों जवळ तुझ्या पाया ।

शुद्ध दगड हा पंत **विठ्ठल** स्वामी रघुराया ॥
उत्तम जन्मा येउनि रामा गेलों मी वायां ॥ ६ ॥

कृष्णंभट बांद्कर ( ३३ )

३३

विश्वाचा विश्राम रे । स्वामी माझा राम रे ।
आनंदाचें धाम त्याचें । गाऊं वाचे नाम रे ॥ ध्रु० ॥
चिद्रत्नाची खाण रे । एकाएकीं जाण रे ।
प्राणाचाही प्राण माझा । सखया ! तूझी आण रे ॥ १ ॥
देवाचा देव जो देव रे । तो हा स्वयमेव रे ।
अलक्ष्य लक्षुनी साक्षी । घेऊं अंगें खेव रे ॥ २ ॥
शिवाचा आराम रे । भक्तपूर्णकाम रे ।
मुक्त योगी जन गाती । जयासी निष्काम रे ॥ ३ ॥
मिथ्या हे अनेक रे । सत्य राम एक रे ।
**विष्णु कृष्ण** जगन्नाथ । करी हा विवेक रे ॥ ४ ॥

## हिंदुस्थानी पदें.

कबीर ( ३४–३६ )

३४

रामभजनकू दिया कमलमुख । रामभजनकू दिया ॥ ध्रु० ॥
लख चौऱ्याशीं फेरे फिरकर सुंदर नरतनु पाया ॥ १ ॥
खाया पीया सुखसे सोया इनमे क्यारे कमाया ॥ २ ॥
जो मुख निशिदिनिं रामनाम नहि वहा तुम कछु नहि किया ॥ ३ ॥
कहत **कबीरा** सुनभाई साधु आया वैसा गया ॥ ४ ॥

३५

भजो रे भया राम गोविंद हरि ॥ ध्रु० ॥
जप तप साधन कछु नहि लागत । खरचत नहि गठरी ॥ १ ॥
संतत संपत सुखके कारन ज्यासे भूल परी ॥ २ ॥
कहत **कबीरा** ज्यो मुखिं राम नहि वो मूखिं धूल भरी ॥ ३ ॥

३६

तूं तो राम सुमर जग लढवा दे ॥ ध्रु० ॥
कोरा कागद् काली शाई लिखत पढत वाकु पढवा रे ॥ १ ॥
रंडी चंडी शितला देवी फतर पुजत वाकु पुजवा दे ॥ २ ॥
हत्ती चलत है अपने गतमो कुतर भुकत वाकु भुकवा दे ॥ ३ ॥
कहत **कबीरा** सुनभाई साधु नरक पचत वाकु पचवा दे ॥ ४ ॥

मिराबाई ( ३७–३८ ) ३७

पग घुंगरूरे पग घुंगरूरे बांधकर नाची रे ॥ ध्रु० ॥
मै अपने तो नारायनकी । हो गइ आपही दासी रे ॥ १ ॥
विषका प्याला राजजिनें भेजा । पीवत मीरा हासी रे ॥ २ ॥
लोक कहे मिरा भई रे बावरी । बाप कहे कुलनासी रे !! ॥ ३ ॥
**मिराके**प्रभु गिरिधर नागर । हरिचरनकी दासी रे ॥ ४ ॥

३८

मोरी लागी लटक गुरुचरननकी ॥ ध्रु० ॥
चरनबिना मुझ कछु नहि भावे । झूट माया सब सपननकी ॥ १ ॥
भवसागर सब सूक गयीं हैं । फिकर नही मुझ तरननकी ॥ २ ॥
**मिरा** कहे प्रभु गिरिधर नागर। उलट भयी मोरे नयननकी ॥ ३ ॥

---

अविनयमपनय विष्णो ! दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम् ।
भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः ॥ १ ॥
सत्यपि भेदापगमे नाथ ! तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः ॥ २ ॥
दामोदर गुणमंदिर सुंदरवदनारविंद गोविंद ।
भवजलधिमथनमंदर परमं दरमनमय त्वं मे ॥ ३ ॥

—श्रीशंकराचार्याः

---

## ४ वरप्रसाद.

### अभंग.

१

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा । माझिया सकळां हरिच्या दासा ॥१॥
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । ही संतमंडळी सुखी असो ॥ ध्रु० ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥२॥
**नामा** म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ३ ॥

२

पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटतसे ॥ १ ॥
झणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या संतसंगा कोठें पाहूं ? ॥ ध्रु० ॥
मग हे पंढरी आनंदसोहळा । कवणाचे डोळां पाहूं देवा ? ॥ २ ॥
मग हे हरिकथा अमृतसंजीवनी । कवणाचे श्रवणीं ऐकों देवा ? ॥ ३ ॥
**नामा** म्हणे मज पंढरीची सोय । अनंत जन्म होय याचिलागीं ॥ ४ ॥

३

सदा माझे डोळां जडो तुझी मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १ ॥
गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्वकाळ ॥ ध्रु० ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ २ ॥
**तुका** म्हणे कांहीं न मागों आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ३ ॥

४

आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥
उभारोनी बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ ध्रु० ॥
' भिऊं नको ' या उत्तरें । करुणाकरें सांतविजे ॥ २ ॥
**तुका** म्हणे केली आस । तो हा दीस फळाचा ॥ ३ ॥

---

१ ' कल्पना अविद्या तेणें झाला जीव '—एकनाथ. २ आवडत्या भाविकांला. ३ कदाचित्; मुक्तिपद देऊं नकोस हा भावार्थ. ४ ' भिऊं नकोस, भिऊं नकोस. '

५

मज दास करीं त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥
मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ ध्रु० ॥
नीचवृत्ति काम । परी मुखीं तुझें नाम ॥ २ ॥
तुका म्हणे सेवे । माझे संकल्प वेंचावे ॥ ३ ॥

६

नीचपण बरवें देवा । नचले कोणाचाही हेवा ॥ १ ॥
महापुरें झाडें जाती । तेथें लव्हाळे वांचती ॥ ध्रु० ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती दुरी ॥
तुका म्हणे कळे[1] । पाय धरिल्या न चले बळ ॥ ३ ॥

७

सद्गदीत कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥ १ ॥
चिंतनाचा एक लाहो[2] । तुमच्या अहो विठ्ठला ॥ ध्रु० ॥
नेत्रीं जळ[3] वाहो सदा । आनंदाचे रोमांच ॥ २ ॥
तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ३ ॥

८

देवा आतां ऐसा करीं उपकार । देहाचा विसर पाडीं मज ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें । ध्रु० ॥
ठाव देई चित्ता राखें पायांपाशीं । सकळ वृत्तींशीं अखंडित ॥ २ ॥
आस, भय, चिंता, लाज, काम क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ॥ ३॥
मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देई ॥ ४ ॥
तुका म्हणे नको वरपंग देवा । घेई माझी सेवा भावशुद्ध ॥ ५ ॥

९

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥

---

१ कळा, युक्ति, गुरुकिल्ली. २ छंद, लाभ. ३ प्रेमाश्रूंबरोबर रज-तम हे चित्तंतले दोष नाहींसे होतात व चित्त पावन होतें.

नलगे मुक्ती धनसंपदा । संतसंग देई सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे गर्भवासी । सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

१०

देवा ऐके हे विनंती मज नको रे हे मुक्ती ।
संतांचा हा संग हेंचि सुख आगळें ॥ १ ॥
या वैष्णवांच्या घरीं प्रेमसुख इच्छा करी ।
ऋद्धि सिद्धि द्वारीं कर जोडुनी तिष्ठती ॥ ध्रु० ॥
वैकुंठींचा वास तया सुखा असे नाश ।
अद्भुत हा रस कथाकाळीं नामाचा ॥ २ ॥
तुझ्या नामाचा महिमा तुज न कळे मेघश्यामा ।
तुका म्हणे आम्हां जन्म गोड यासाठीं ! ! ॥ ३ ॥

११

अवघा बोले चाले हरी । ज्याची कथा तोची करी ॥ १ ॥
होऊनियां श्रोता वक्ता । करी आपुली आपण कथा ॥ ध्रु० ॥
विश्वव्यापक परिपूर्ण । अवघा एकचि नारायण ॥ २ ॥
कैंचा **रमावल्लभदास** । अवघा हरीचा उल्लास ॥ ३ ॥

पद.

इतुकें दे मजला दे मजला । मागतसें हरि तुजला ॥ १ ॥
संतसमागम अर्चा । सारासारज्ञानचर्चा ॥ ध्रु० ॥
भगवद्भजनीं जागो । मन हें तुझिया स्वरूपीं लागो ॥ २ ॥
असेंचि वैभव देई । **शिवदिन** केसरिगुरुचे पायीं ॥ ३ ॥

## मोरोपंती श्लोक.

सुसंगति सदा घडो, सुजनवाक्य कानीं पडो,
कलंक मतिचा झडो, विषय सर्वथा नावडो, ।
सदंघ्रिकमळीं दडो, मुरडितां हटानें अडो,
वियोग घडतां रडो, मन भवच्चरित्रीं जडो, ॥ १ ॥

न निश्चय कधीं ढळो, कुजनविघ्नबाधा टळो,
न चित्त भजनीं चळो, मति सदुक्तमार्गीं वळो, ।
स्वतत्त्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो,
पुन्हां न मन हें मळो, दुरित आत्मबोधें जळो ॥ २ ॥

## ज्ञानेश्वरीचें भरतवाक्य.

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें[1] तोषावें । तोषोनि मज द्यावें । पसायदान[2] हें ॥ १ ॥ जे खळाची व्यंकटी[3] सांडो । तयां सत्कर्मीं रती वाढो । भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥ २ ॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो[4] ॥ जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥ वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी[5] । अनवरत[6] भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ४ ॥ चलां[7] कल्पतरूंचे अरव[8] । चेतना चिंतामणींचे गांव । बोलते जे अर्णव[9] । पीयूषाचे ॥ ५ ॥ चंद्रमे जे अलांछन[10] । मार्तंड जे तापहीन । ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६ ॥ किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होवोनि तिहीं लोकीं । भाजिजो आदिपुरुषीं । अखंडित ॥ ७ ॥

## सार्वजनिक प्रार्थना.

स्वस्ति प्रजाभ्यः परिपालयंतां । न्याय्येन मार्गेण महीं महीशाः ।
गोब्राह्मणेभ्यः शुभमस्तु नित्यं । लोकाः समस्ताः सुखिनो भवंतु ॥ १ ॥
सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ २ ॥
काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी शस्यशालिनी ।
देशोऽयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः ॥ ३ ॥

---

१ वाणीरूप यज्ञानें. २ प्रसाद. ३ वांकडेपणा. व्यंकटेश म्हणजे वक्र किंवा दुष्ट अशांचा शास्ता. ४ प्रकाशो. ५ समुदाय. ६ सर्वदा. ७ चालत्या. ८ अंकुर. ९ समुद्र. १० कलंकरहित.

## ५ धन्यता.

### पद.

आनंदरस हा प्याला । भवताप शांतचि झाला ॥ ध्रु० ॥
अनंतकोटी कल्मषपाश । पावे एका समयिं विनाश ।
दृढ धरितां सद्गुरुची कास । निजगुज सांगुनि गेला ॥ १ ॥
आतां मज हो कैंचें ध्यान । विसरुनि गेलें समुळीं भान ।
श्रवण कराया नाहीं मज कान । संकल्पचि निमाला ॥ २ ॥
मेली यद्यपि आहे माय । केला जीणें दृढ व्यवसाय ।
**रामसखा** तो शोकेल काय । चिन्मय होउनि ठेला ॥ ३ ॥

### अभंग.

१

आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाहला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ ध्रु० ॥
एकदेशी होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥२॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । 'मी-माझ्या' संकोचें दूरी झालों ॥ ३ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनीयां भाव ठेलों पायीं ॥ ४ ॥
**तुका** म्हणे दिलें उमटूनी जगीं । घेतलें तें अंगीं लावूनीयां ॥ ५ ॥

२

प्रेम-अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥
सकळही तेथें बोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ ध्रु० ॥
सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप । ओतलें स्वरूप तयांमाजी ॥ २ ॥
**तुका** म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ३ ॥

३

याचसाठीं केला होता अट्टहास । शेवटचा दीस गोड व्हावा ॥ १ ॥
आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा । खुंटलीया धांवा तृष्णेचीया ॥ ध्रु० ॥
कवतुक वाटे जालिया वेंचाचें । नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ २ ॥
**तुका** म्हणे मुक्ति परिणिली नोवरी । आतां दिवस चारी खेळीमेळीं ॥ ३ ॥

---

१. 'मरणाही आधीं राहिलों मरोनी'–तुकाराम. २ युक्त, व्यापलेला.

# ३ सद्गुरुस्तव.



काषायवस्त्रं करदंडधारिणं कमंडलुं पद्मकरेण शंखम् ।
चक्रं गदाभूषितभूषणाढ्यं श्रीपादराजं शरणं प्रपद्ये ॥ १ ॥

---

तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ।
शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥
—भागवत ११-३-२१.

## अभंग.

### १

श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा । इतरांचा लेखा कोण करी ! ॥ १ ॥
राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगें सिद्धि पावे ॥ ध्रु० ॥
कल्पतरुतळवटीं जो कोणीं बैसला । काय वाणी त्याला सांगिजो जी ॥ २ ॥
**ज्ञानदेव** म्हणे तरलों तरलों । आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ ३ ॥

### २

सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली । निजवस्तु[1] दाविली माझी मज ॥ १ ॥
माझें सुख मज दावियेलें डोळा । दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥ ध्रु० ॥
तया उतराई व्हावें कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥ २ ॥
डोळियांचा डोळा उघडिला जेणें । लेवविलें लेणें आनंदाचें ॥ ३ ॥
**नामा** म्हणे निकी सांपडली सोय । न विसंबे पाय खेचराचे ॥ ४ ॥

### ३

सद्गुरूचे पाय जीवें न विसंबावें । मन वळवावें वृत्तिसहित ॥ १ ॥
डोळियाचे डोळे उघडले जेणें । आनंदाचें लेणें लेवविलें ॥ ध्रु० ॥
जन्ममरणाचें फेडिलें सांकडें । कैवल्याचि फुडें दाखविलें ॥ २ ॥
मोहरले तरु पुष्पफळभारें । तेचि निर्विकार सनकादिक ॥ ३ ॥
**नामा** म्हणे स्वामी खेचर माउली । कृपेची साउली केली मज ॥ ४ ॥

---

१ आत्मस्वरूप. ‘ तुझें आहे तुजपाशीं. ’

४

ॐकारस्वरूपा सद्गुरुसमर्था । अनाथाच्या नाथा तुज नमो ॥ १ ॥
गुरुराव स्वामी आतां स्वप्रकाश । ज्यापुढें उदास चंद्र रवी ॥ २ ॥
वेदां पडलें मौन शास्त्रें वेडावलीं । वाचा हे निमाली ते श्रीगुरु ॥ ३ ॥
श्रीगुरु जयासी पाहे कृपादृष्टि । तयासी हे सृष्टी पांडुरंग ॥ ४ ॥
प्रभुराज माझा स्वामी गुरुराव । देतो मज भाव शुद्ध भूमि ॥ ५ ॥
भूमि शुद्ध करी ज्ञानबीज पेरी । अद्वैत हे धरी मी तूं नेणें ॥ ६ ॥
मजलागीं माझी सद्गुरु माउली । कृपा करी साउली वर्णूं काय ॥ ७ ॥
**एका जनार्दनीं** गुरु परब्रह्म । तयाचें पैं नाम सदा मुखीं ॥ ८ ॥

---

## २ गुरुपादुकाष्टक.

ज्या संगतीनेंच विराग झाला । मनोदरीचा जड भाग गेला ॥
साक्षात् परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ १ ॥
सद्योगपंथें घरिं आणियेलें । अंगेंच मातें परब्रह्म केलें ॥
प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ २ ॥
चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची ॥
परंपदीं संगम पूर्ण जाला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ३ ॥
जो सर्वदा गुप्त जनांत वागे । प्रसन्न भक्तां निजबोध सांगे ॥
सद्भक्तिभावाकरितां भुकेला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ४ ॥
अनंत माझ्या अपराधकोटी । नाणी मनीं घालुनि सर्व पोटीं ॥
प्रबोध करितां श्रम फार जाला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ५ ॥
कांहीं मला सेवनही न जालें । तथापि तेणें मज उद्धरीलें ॥
आतां तरी अर्पिन प्राण त्याला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ६ ॥
माझा अहंभाव असे शरीरीं । तथापि तो सद्गुरु अंगिकारीं ॥
नाहीं मनीं अल्पविकार ज्याला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ७ ॥

आतां कसा हा उपकार फेडूं । हा देह ओवाळुनि दूर सोडूं ॥
म्यां एकभावें प्रणिपात केला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ ८ ॥
ज्या वानितां वानितां वेदवाणी । म्हणे ' नेति नेती ' ति लाजे दुरूनी ॥
नव्हे अंत ना पार ज्याच्या रुपाला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥९॥
जो साधुचा अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला ॥
**नारायणाचा** भ्रम दूर केला । विसरूं ० ० ० ० ० ० ० ० ० ॥ १० ॥

---

## ३ सद्गुरुस्तोत्र.

गुरू ! गुणालया ! परापराधिनाथ[1] सुंदरा !
शिवादिकांहुनी वरिष्ठ तूंचि एक साजिरा ।
गुणावतार तूं धरोनियां जगासि तारिसी
सुरां मुनीश्वरां अलभ्य त्या गतीस दाविसी ॥ १ ॥
जयां गुरुत्व बोधिलें तयांसि कार्य साधिलें
भवार्णवासि लंघिलें सुविघ्नदुर्ग भंगिलें ।
सहा रिपूंसि जिंतिलें निजात्मतत्त्व चिंतिलें
परात्परासि[2] पाहिलें प्रकृष्टदुःख साहिलें ॥ २ ॥
गुरू उदार माउली प्रशांतिसौख्यसाउली
जया नरासि फावली[3] तयास सिद्धि गांवली ।
' गुरू गुरू गुरू गुरू ' म्हणोनि जो स्मरे नरू
तरोनि मोहसागरू सुखी घडे निरंतरू ॥ ३ ॥
गुरू चिदब्धिचंद्र[4] हा महत्पदीं महेंद्र हा
गुरू प्रतापरुद्र हा गुरू कृपासमुद्र हा ।
गुरू स्वरूप दे स्वतां गुरूचि ब्रह्म सर्वथा
गुरूविना महाव्यथा नसे जगीं निवारिता ॥ ४ ॥

---

१ पराविद्या व अपराविद्या यांचा स्वामी. २ परावाचेच्या पलीकडचें जें स्वस्वरूप तें. ३ सांपडली, लाभली. ४ ज्ञानसागराला भरती आणणारा पूर्णचंद्र.

शिवाहुनी गुरू असे अधीक हें मला दिसे
नरांसि मोक्ष द्यावया गुरुस्वरूप घेतसे ! ।
शिवें स्वरूप आपुलें न मोक्षदक्ष देखिलें
गुरुत्व पूर्ण घेतलें म्हणोनि कृत्य साधिलें ॥ ५ ॥

गुरूचि बाप माउली गुरूचि दीन–साउली
गुरूचि शिष्यवासुरांसि कामधेनु गौउली ।
गुरूचि चिंतितार्थ दे गुरूचि तत्त्व तो वदे
अलभ्य मोक्षलाभ आपुल्या कृपें गुरूचि दे ॥ ६ ॥

गुरूचि भेद नाशितो जडांधकार शोधितो
गुरूचि मोह वारितो अविद्यभाव सारितो ।
गुरूचि ब्रह्म दावितो गुरूचि ध्यान लावितो
गुरूचि विश्व सर्व आत्मरूप हें बुझावितो ॥ ७ ॥

गुरूचि मूळदीप रे जगत् गुरुस्वरूप रे
समस्त देवही तदंश दिसताति साजिरे ! ।
गुरूचि पूर्णसिंधु रे तयांत देव बिंदु रे
गुरू स्वयंभु सूर्य अन्य सर्वही मयूख रे ॥ ८ ॥

गुरूचि दिव्य दृष्टि रे गुरूचि सर्व सृष्टि रे
गुरूचि ज्ञानबोध रे गुरूचि सर्व शोध रे ।
गुणांत तोचि विस्तरे मनांत तोचि संचरे
समस्त भूतमात्र चेष्टवोनि एकला उरे ॥ ९ ॥

---

१ मुमुक्षूंस मोक्ष देण्यासाठीं गुरूचेंच रूप ईश्वराला घ्यावें लागतें, म्हणून ईश्वराहून गुरूच श्रेष्ठ आहे असें गुरुभक्त भावतो; वस्ततः गुरु व देव दोन नाहींत. २ गावली, सांपडला. ३ म्हणून त्याला कल्पतरु म्हणतात. ४ तो कल्पनेचें बंड मोडून निर्विकल्प सुख देतो. ५ सारें जगच गुरुस्वरूप आहे; गुरुच जगद्रूपानें नटला आहे. ६ सर्व देव हे गुरुरूप सूर्याचीं किरणें आहेत.

गुरू विराटरूप रे गुरू हिरण्यगर्भ रे
गुरूचि ॐ त्रिवर्ण पंचवर्ण मुख्य तार रे ।
गुरूचि विश्व तैजसू गुरूचि प्राज्ञ पुरुषु
गुरूविना दुजा नसे श्रुतीस घोष सर्वसु ॥ १० ॥
गुरूचि ध्येय ध्यान रे गुरूचि सर्व मान रे
नसे गुरूसमान रे जगीं गुरूस मान रे ।
गुरूचि थोर सान रे महासुखा निदान रे
गुरू गुरू गुरू गुरू करीं म्हणोनि गान रे ॥ ११ ॥
गुरुस्वरूप चिंतिजे समाधि हेचि बोलिजे
समस्त वेदपाठनामंत्रजाप्य जाणिजे ।
यथार्थ सर्व तीर्थ सद्गुरूपदाब्जतोय हें
गुरूचि सेवणें अनेक अश्वमेधयज्ञ हे ॥ १२ ॥
नमो गुरू कृपाकरा नमो गुरू गुणाकरा
नमो गुरू परात्परा नमो गुरू महत्तरा ।
नमो गुरू सनातना नमो गुरू मनोन्मना
नमो गुरू घनाघना नमो गुरू निरंजना ॥ १३ ॥

—निरंजनमाधव.

## ४ पदें

### १

माझी देवपूजा देवपूजा । पाय तुझे गुरुराजा ॥ ध्रु० ॥
गुरुचरणाची माती । तेचि माझी भागीरथी ॥ माझी० ॥ १ ॥
गुरुचरणाचा बिंदु । तोचि माझा क्षीरसिंधु ॥ माझी० ॥ २ ॥

---

१ विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत व मळप्रकृति हे ब्रह्मांडाचे चार देह आहेत. २ ॐ हा अ, उ व मु असा त्रिवर्णात्मक आहे, असें कोणी म्हणतात व अ, उ, अर्धमात्रा व बिंदु असा पंचवर्णात्मक आहे असेंही कोणी म्हणतात. तार म्ह० तारणारा प्रणव. ३ विश्व, तैजस, प्राज्ञ व प्रत्यगात्मा हे चार देहाचे चार अभिमानी पुरुष आहेत.

गुरुचरणाचें ध्यान । तेंचि माझें संध्यास्नान ॥ माझी० ॥ ३ ॥
**शिवदिनकेसरि**पायीं । सद्गुरुवांचुनी दैवत नाहीं ॥ माझी० ॥ ४ ॥

२

श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ ध्रु० ॥
निगमनिखिलसाधारण सुलभाहुनि सुलभ बहू ।
इतर योगयागविषमपंथिं कां शिरावें ! ॥ १ ॥
नरतनुदृढनावेसी बुडवुनि अतिमूढपणें ।
दृष्ट नष्ट कुकरसुकरतनु कां फिरावे ॥ २ ॥
**रामदास** विनवी तुज अजुनि तरी समज उमज ।
विषयवीष पेउनियां फुकट कां मरावें ! ॥ ३ ॥

३

गुरुमहाराज गुरु जयजय परब्रह्म सद्गुरु ॥ ध्रु० ॥
चारी मुक्तीदायक दाता उदार कल्पतरु ॥ जय० ॥ १ ॥
रूप जयाचें मनबुद्धीपर वाचे अगोचरू ॥ जय० ॥ २ ॥
अलक्ष्य अनाम अरूप अद्वय अक्षय परात्परू ॥ जय० ॥ ३ ॥
**आत्मारामी** रामदास गोपाळ करुणाकरु ॥ गुरु० ॥ ४ ॥

४

झालें बाई ! वेडी ! दरबार गुरूचा झाडी ॥ ध्रु० ॥
देहपीतांबर फाडिला । नवरत्नांचा हार काढिला ।
सद्गुरूचे गळां घातला । वासना सोडी ॥ दरबार० ॥ १ ॥
कल्पनाकांचोळी काढिली । त्रिगुणाची वेणि सोडिली ।
चारि देहांची मुक्ति साधिली । परी ती थोडी ॥ दर० ॥ २ ॥
वेडी झाल्यें सद्गुरुघरची । चिंता हारपली मनाची ।
सोय दाखविलि स्वस्वरूपाची । लागली गोडी ॥ दर० ॥ ३ ॥
चिन्मयस्वरूप दाखवीलें । आपणांमध्यें मेळवीलें ।
पूर्णानंद गुरूनें केलें । पाय ना सोडी ॥ दरबार० ॥ ४ ॥

---

## ५. श्रीदत्तगुरुशरणाष्टकम्.

दत्तात्रेया तव शरणं । दत्तनाथा तव शरणं ॥ त्रिगुणात्मका त्रिगुणातीता त्रिभुवनपालक तव शरणम् ॥ १ ॥ शाश्वतमूर्ते तव शरणम् । श्यामसुंदरा तव० ॥ शेषाभरणा शेषभूषणा शेषशायि गुरु तव शरणम् ॥ २ ॥ षड्भुजमूर्ते तव शरणं । षड्भुजयतिवर तव शरणम् । दंडकमंडलुगदापद्मकर शंखचक्रधर तव शरणम् ॥ ३ ॥ करुणानिधे तव शरणं । करुणासागर तव शरणं ॥ श्रीपादश्रीवल्लभ गुरुवर नृसिंहसरस्वति तव शरणम् ॥ ४ ॥ श्रीगुरुनाथा तव शरणं । सद्गुरुनाथा तव० ॥ कृष्णासंगमतरुवरवासी भक्तवत्सला तव शरणम् ॥ ५ ॥ कृपामूर्ते तव० । कृपासागरा तव० । कृपाकटाक्षा कृपावलोकन कृपानिधे प्रभु तव० ॥ ६ ॥ कालांतका तव० । कालनाशका तव० ॥ पूर्णानंदा पूर्णपरेशा पुराणपुरुषा तव० ॥ ७ ॥ जगदीशा तव० । जगन्नाथा तव० । जगत्पालका जगदाधीशा जगदुद्धारा तव० ॥ ८ ॥ अखिलांतरा तव० । अखिलैश्वर्या तव० ॥ भक्तप्रिया वज्रपंजरा प्रसन्नवक्त्रा तव० ॥ ९ ॥ दिगंबरा तव० । दीनदयाघन तव० ॥ दीनानाथा दीनदयाळा दीनोद्धारा तव० ॥ १० ॥ तपोमूर्ते तव० ॥ तेजोराशी० ॥ ब्रह्मानंदा ब्रह्मसनातन ब्रह्ममोहना तव० ॥ ११ ॥ विश्वात्मका तव० ॥ विश्वरक्षका० ॥ विश्वंभरा विश्वजीवना विश्वपरात्पर तव० ॥ १२ ॥ विघ्नांतका तव० । विघ्ननाशका० ॥ प्रणवातीता प्रेमवर्धना प्रकाशमूर्ते तव० ॥ १३ ॥ निजानंदा तव० । निजपददायक तव० ॥ नित्यनिरंजन निराकारा निराधारा तव० ॥ १४ ॥ चिद्घनमूर्ते तव० ॥ चिदाकारा तव० ॥ चिदात्मरूपा चिदानंदा चित्सुखकंदा तव० ॥ १५ ॥ अनादिमूर्ते तव० ॥ अखिलवतारा तव० ॥ अनंतकोटिब्रह्मांडनायका अघटितघटना तव० ॥ १६ ॥ भक्तोद्धारा तव० । भक्तरक्षका तव० । भक्तानुग्रहगुरुभक्तप्रिया पतितोद्धारा तव० ॥ १७ ॥

---

### अभंग

नमन माझें गुरुराया । महाराजा दत्तात्रेया ॥ १ ॥
तुझी अवधूत मूर्ती । माझ्या जिवींची विश्रांती ॥ ध्रु० ॥
जीवींचें सांकडें । कोण उगवील कोडें ॥ २ ॥
अनसूयासुता । तुका म्हणे पाव आतां ॥ ३ ॥

# संतमाहात्म्म.

सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।
भतानि भगवत्यात्मान्येष भागवतोत्तमः ॥ २·४५
निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शिनम् ।
अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ॥ १५-१६ ॥

श्रीमद्भागवत स्कंध ११.

१

भक्तांमाजी अग्रगणी । पुंडलीक महामुनी ॥ १ ॥
त्याचे प्रसादें तरले । साधुसंत उद्धरले ॥ ध्रु० ॥
तोचि प्रसाद आम्हांसीं । विटेवरी हृषीकेशी ॥ २ ॥
पुंडलीक बापमाय । दासी जनी वंदी पाय ॥ ३ ॥

२

"माझे भक्त मज अनुसरले चित्तें[3] । त्याहूनी पढियंते मज आणीक नाहीं ॥१॥
व्यक्ती येणें मज तयांचिये आवडी । युगायुगीं प्रौढी हेचि मिरवी ॥ २ ॥
त्यांचेनी कृतार्थ असें मी पूर्णकाम । ते माझे परम प्राणसखे ॥ ३ ॥
ते माझे आश्रमी मी त्यांचा विश्राम । जिहीं रूपनाम केलें मज ॥ ४ ॥
मी त्यांचा सोयरा ते माझे सांगाती । करी त्या एकांतीं सुखगोष्टी ॥ ५ ॥
जिहीं तनुमनप्राण लाविला मजकडे । मी तयां आवडें जीवाहूनी ॥ ६ ॥
ते माझे भाग्याचे अधिकारी विभागी । वैकुंठ त्यांलागीं वसतें केलें ॥ ७ ॥
त्यांचें गुणागौप्य मीचि एक जाणें । माझी प्रेमखूण कळली तयां ॥ ८ ॥
मनाची साउली करूनियां मातें । भोगिती आतां ते सर्वसुख ॥ ९ ॥
आपुलियाचि किरणें विराजे गभस्ती । परी किरण न होती आन जेवीं ॥१०॥
तैसे माझे दास मजमाजी उदास । असती समरस दुजेनेंवीण ॥ ११ ॥

---

१ हें पांडुरंगाचें नामदेवाशीं भाषण आहे. 'तीर्थावळी' पहा. २ प्रिय, आवडतें.
३ एकात्मतेच्या भावानें अभिन्नपणानें मज भजतात.

मी तो भक्तरूप भक्त माझें स्वरूप । प्रभा आणि दीप जयापरी ॥ १२ ॥
हे खुण अनुभवी जाणती ते ज्ञानी । ज्यां नाहीं आयणी कासयाची ॥१३॥
त्यांचिया चरणींचें रज माझे नामें । जें सांडिलें रजतमें सत्वशीळ ॥ १४ ॥
त्यांचे भेटीलागीं हृदय कळवळे । कैं देखेन डोळे निवती माझे ॥ १५ ॥

३

ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धराया आले दीनजनां ॥ १ ॥
ब्रह्मादिक त्यांचें वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती ॥ ध्रु० ॥
हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो ॥ २ ॥
अखंडित **नामा** त्याची वाट पाहे । निशिदिनीं ध्यायें सत्संगती ॥ ३ ॥

४

संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ १ ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ ध्रु० ॥
कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे नामरूप ॥ २ ॥
**नामा** म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ३ ॥

५

उदार तुम्हीं संत । मायबाप कृपावंत ॥ १ ॥
केवढा केला उपकार । काय वानूं मी पामर ॥ ध्रु० ॥
जडजीवां उद्धार केला । मार्ग दाविला सुपंथ ॥ २ ॥
**सेना** म्हणे उतराई । होतां कांहीं दिसेना ॥ ३ ॥

६

तोचि एक संत जाणा । नारायणा आवडती ॥ १ ॥
पांडुरंगावांचुनि कांहीं । न जाणे पाहीं दुसरें ॥ ध्रु० ॥
मुखीं नाम अमृतवाणी । धाले मनीं डुल्लती ॥ २ ॥
**सेना म्हणे** पायीं माथा । त्यांच्या आतां ठेविला ॥ ३ ॥

७

संत जाती हरिकीर्तना । त्यांचे वाहिन मोचे वाहणा ॥ १ ॥
हेचि भवसिंधूचें तारूं । येणें उतरूं पैलपारू ॥ ध्रु० ॥

---

१ तत्त्वनिर्णयेच्छा, ज्यांची जिज्ञासापूर्ण झाली आहे. २ पायांचें तीर्थ.

जन्मोजन्मींचें भेषज । तें हें संतचरणरज ॥ २ ॥
संतचरणींच्या पादुका । झाला जनार्दनीं **एका** ॥ ३ ॥

८

श्रीसंतांचिये माथा चरणांवरी माझा । देहीं भाव दुजा नाहीं नाहीं ॥ १ ॥
नामाचें चिंतन करिती सर्वकाळ । ते माझे केवळ मायबाप ॥ ध्रु० ॥
मायबाय म्हणों तरि लाजिरवाणें । चुकविलें येणें संतजनीं ॥ २ ॥
ज्या ज्या जन्मा यावें मायबाप दोनी । परी संत निर्वाणीं मिळतीना ॥३॥
येचि देहीं डोळां संतांसी देखिलें । **एकाजनार्दनीं** वंदिले चरण त्यांचे ॥४॥

९

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥
आईकाजी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ ध्रु० ॥
कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ २ ॥
**तुका** म्हणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे ॥ ३ ॥

१०

काय वानूं मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागवीती ॥ १ ॥
काय द्यावें यांसीं व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ ध्रु० ॥
सहज बोलणें हितउपदेश । करूनी सायास शिकवीती ॥ २ ॥
**तुका** म्हणे वत्स धेनुवेचे चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ३ ॥

११

जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि दैवाचा पुतळा ॥ १ ॥
आणिक न ये माझ्या मना । हो कां पंडित शाहाणा ॥ ध्रु० ॥
नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥
**तुका** म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ४ ॥

१२

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ ध्रु० ॥

संपुष्ट हे हृदयपेटी । करूनि पोटीं सांठवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

१३

वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥
करिती घोष जयजयकार । जळती दोषांचे डोंगर ॥ ध्रु० ॥
क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं ॥ २ ॥
तुका म्हणे बळी । तेचि एक भूमंडळीं ॥ ३ ॥

१४

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ[1] । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ ध्रु० ॥
संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ २ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ३ ॥
संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुखसाटी देती घेती ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी[3] । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा ॥ ५ ॥

१५

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपली परीसें । नेणें शिवों कैसें लोखंडासी ॥ ध्रु० ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति । देह कष्टवीती उपकारें ॥ २ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां । आपुलिया ममता नाहीं देहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ४ ॥

१६

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणे जो आपुले ॥ १ ॥
तोचि साधू ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ ध्रु० ॥

---

१ पुष्कळ. २ सवदा, साटलोट. ३ प्रकार. ४ परीस आपला मोठेपणा विसरून लोहास शिवून त्याचें सोनें करितो तसे संत दयेनें पतिताचेंही सोनें करितात! ५ संत परसुखें सुखावतात व मुखें अमृत स्रवतात.

मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ २ ॥
ज्यासी आपंगितां नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥ ३ ॥
दया करणें पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ४ ॥
**तुका** म्हणे सांगों किती । तोचि भगवंतांची मूर्ती ॥ ५ ॥

१७

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥
विषय तो त्यांचा जाला नारायण । नावडे जनधन मातापिता ॥ ध्रु० ॥
निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ २ ॥
**तुका** म्हणे सत्यकर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नरका जाणें ॥ ३ ॥

१८

आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥
ऐसा संतांचा महिमा । झाली बोलायासी सीमा ॥ ध्रु० ॥
तीर्थें पर्वकाळ । अवघीं पायापें सकळ ॥ २ ॥
**तुका** म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ३ ॥

१९

शुद्ध बीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥ ध्रु० ॥
सर्वांग निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ २ ॥
**तुका** म्हणे जाती । ताप, दर्शनें विश्रांती ॥ ३ ॥

२०

हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळ्यां गळा मेळवूनी ॥ १ ॥
भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीवींचिया ॥ ध्रु० ॥
योगियांच्या ध्याना जो नये । भाकरी त्यांच्या मागोनि खाये ॥ २ ॥
**तुका** म्हणे असे शाहाणीया दूरी । बोबडिया दासां हांका मारी ॥ ३ ॥

२१

तुम्हीं संत मायबाप कृपावंत । काय मी पतीत कीर्ति वानूं ॥ १ ॥
अवतार तुम्हां धराया कारण । उद्धरावें जड जन जीवां ॥ ध्रु० ॥

१ रक्षिता, पोशिंदा. २ 'कनककांता नये चित्ता। तोचि परमार्थ परता' रामदास.

वाढवाया सुख भक्तिभाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ २ ॥
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्ही जगीं संतजन ॥ ३ ॥

२२

माझिये जातीचे मज भेटो कोणी । आवडीची धणी फेडावया ॥ १ ॥
आवडे ज्या हरी अंतरापासूनी । ऐसियाचे मनीं आर्त माझें ॥ ध्रु० ॥
तयालागीं जीव होतो कासावीस । पाहतील वास नयन हे ॥ २ ॥
सफळ हा जन्म होईल तेथून । देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ३ ॥
तुका म्हणे तोची सुदीनसोहळा । गाऊं या गोपाळा धणीवरी ॥ ४ ॥

२३

ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥
नाहीं त्या विटाळ अखंड सोंवळीं । उपाधिवेगळीं जाणिवेच्या ॥ ध्रु० ॥
मन हें निश्चळ झालें एके ठायीं । तया उणें काई निजसुखा ॥ २ ॥
पुण्यवंत तेच परउपकारी । प्रबोधी त्या नारीनरलोकां ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनियां वास करिन तेथें ॥ ४ ॥

२४

कामक्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं । आवडी धरिली पायांसवें ॥ १ ॥
आतां कोण पाहे मागें परतोनी । गेला हारपोनी देहभाव ॥ ध्रु० ॥
रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाथा । तेथें या प्राकृता कोण मानी ॥ २ ॥
तुका म्हण आम्ही विठोबाचे दास । करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥

२५

लेंकुराचें हित । जाणे माउलीचें चित्त ॥ १ ॥
ऐसी कळवळ्याची जाती । करी लाभाविण प्रीती ॥ ध्रु० ॥
पोटीं भार वाहे । त्याचें सर्वस्वही साहे ॥ २ ॥
तुका म्हणे माझें । तुम्हां संतांवरी ओझें ॥ ३ ॥

२६

निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥
निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास । पाहों नये वास आणिकांची ॥ ध्रु० ॥
तुका म्हणे ऐसा कोणीं उपेक्षीला । नाहीं आयकिला ऐसा कोणी ॥ २ ॥

२७

पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥ ध्रु० ॥
देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ २ ॥
काय त्या उरलें वेगळें आणिक । वैकुंठनायक जया कंठीं ॥ ३ ॥
**तुका** म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ४ ॥

२८

तेचि संत तेचि संत । ज्यांचा हेतु विठ्ठलीं ॥ १ ॥
नेणती कांहीं टाणेटोणे । नामस्मरणेवांचूनी ॥ ध्रु० ॥
काया वाचा आणि मनें । धाले चिंतनें डुल्लती ॥ ३ ॥
**निळा** म्हणे विरक्त देहीं । आठवचि नाहीं विषयांचा ॥ ३ ॥

## पदें.

१

संतपदाची जोड । दे रे हरी ॥ ध्रु० ॥ संतसमागमें आत्मत्वाचा । सुंदर उगवे मोड ॥ १ ॥ सुफलित करुनी पूर्ण मनोरथ । पुरविसि जिविचें कोड ॥ २ ॥ **अमृत** म्हणे रे हरि ! भक्तांचा । शेवट करिसी गोड ॥ ३ ॥

२

ते धन्य जगदुद्धारी विद्वज्जनविजनविहारी ॥ धु० ॥ भक्तांसी भगवद्भजनें भवसागर मृगजलवत रे । चिद्विलास जगनग हेमीं वस्तुत्वें भेदातित रे ॥ अस्तिभातिप्रियरूप आत्मा तो नामरूपविरहित रे । होउनियां अनुभव ऐसा हरिभजनीं अत्यद्भुत रे ॥ १ ॥ जाळिलें संचित समुळीं ज्ञानाग्नीमाजी निगुती । क्रियमाण पूर्वप्रवाहें विधिपूर्वक कर्में घडती ॥ निर्हेतुक निरहंकारें ब्रह्मार्पण सहजचि होतीं । प्रारब्ध कलेवर भोगी साक्षी हा ईश्वरमूर्ती ॥ २ ॥ अहिकुंडलवत् तनु पाहतां संतोषविस्मय न वसे । तैसें या विद्वद्वर्या स्वरुपाहुनि आन न भासे ॥ मृत्तिकेवरी कुलाळें घट कोठुनि आणविलासे । रंगला या **निजरंगीं** निरतिशय सदनिं विलासे ॥ ३ ॥

---

# नामसंकीर्तन.



कल्याणानां निधानं कलिमलमथनं पावनं पावनानां
पाथेयं यन्मुमुक्षोः सपदि परपदप्राप्तये प्रस्थितस्य ।
विश्रामस्थानमेकं कविवरवचसां जीवनं सज्जनानां
बीजं धर्मद्रुमस्य प्रभवतु भवतां भूतये रामनाम ॥ १ ॥

बुद्धी बडी चतुराइ बडी सुंदराइ बडी तनमे लपटी है
धन बडो धाम बडो ज्याके कीरत हूं जगमा प्रगटी है ॥ १ ॥
द्वारे मनुष्य हजार ठाडे ज्याके इंद्र कुही एक घटी है ।
कहे **तुलसी** एक रामके नामबिना सुंदरनारकी नाक कटी है ! ॥२॥

## १ अभंग.

ज्ञानेश्वरी ( १-२ ) १

**गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना ।**
**आनु न विसंबे हरि जगत्रयजीवना ॥ १ ॥**
**सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहला ।**
**नाम आठवितां रूपीं प्रगट पैं झाला ॥ ध्रु० ॥**
**तनु मनु शरण विनटलों तुझ्या पाईं ।**
**बाप रखुमादेवीवरावांचूनि आनु नेणें कांहीं ॥ २ ॥**

२

**हरि आला रे हरि आला रे । संतसंगें ब्रह्मानंदु झाला रे ॥ ध्रु० ॥**
**हरि येथें रे हरि तेथें रे । हरिवांचुनि न दिसे रितें रे ॥ १ ॥**
**हरि पाहीं रे हरि ध्याई रे । हरिवांचुनि दुजें नाहीं रे ॥ २ ॥**
**हरि वाचे रे हरि नाचे रे । हरि पाहतां आनंदु सांचे रे ॥ ३ ॥**
**हरि आदीं रे हरि अंतीं रे । हरि व्यापक सर्वांभूतीं रे ॥ ४ ॥**
**हरि जाणा रे हरि वाना रे । बापरखुमादेवीवरु राणा रे ॥ ५ ॥**

मुक्ताबाई ( ३ ) ३

मुक्तामुक्त दोन्ही नाइकतो कर्णी । हरिनामपर्वणी सदा काळ ॥ १ ॥

नाहीं काळ तेथें आम्हां वेळ कैंची । हरिनामछंदाची गोडी थोरी ॥ २ ॥

नाना विघ्नबाधा नाइकों आम्ही कदा । निरंतर धंदा रामकृष्ण ॥ ३ ॥

मुक्तपणें मुक्त मुक्ताई पैं रत । हरिनाम स्मरत सर्वकाळ ॥ ४ ॥

निवृत्तिनाथ ( ४ ) ४

नाम मुखीं सदा तोचि पैं भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं ॥ १ ॥

रामनाम हरी सर्वकाळ वसे । तेथेंचि निवासे वसे हरी ॥ २ ॥

हरि ध्यान वसे अखंड पैं सर्वदा । न पवे तो आपदा इये जनीं ॥ ३ ॥

**निवृत्ति** समता हरिभजन करी । सर्वत्र कामारी ऋद्धिसिद्धि ॥ ४ ॥

सोपानदेव ( ५ ) ५

मनाचे मवाळ हरिरूप चिंतिती । रामकृष्णमतीं नित्यकथा ॥ १ ॥

रामकृष्णध्यान सदा पैं सर्वदा । न पवेल आपदा नानायोनी ॥ २ ॥

हरिध्यानजप मुक्त पैं अनंत । जीवशीवीं रत सर्वकाळ ॥ ३ ॥

**सोपान** प्रेमाचा आनंद हरीचा । तुटला मोहाचा मोहपाश ॥ ४ ॥

नामदेव ( ६ ) ६

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंच नीच योनी हेंही नसे ॥ १ ॥

धरा नाम कंठीं सदासर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥

कृपाळु कोंवसा[३] सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥

**नामा** म्हणे फार सोपें हें साधन । वाचें नाम घेणें इतुकेंची ॥ ४ ॥

जनाबाई ( ७ ) ७

नाम फुकट चोखट । नाम घेतां नये वीट ॥ १ ॥

जड शिळा ज्या सागरीं । आत्माराम नामें तारी ॥ २ ॥

पुत्रभावें स्मरणें केलें । तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥

नाममहिमा **जनी** जाणे । ध्यातां विठ्ठलची होणें ॥ ४ ॥

---

१ कोमल. २ पावेल. ३ आधार. ४ श्रीराम. ५ अजामेळानें.

कान्हूपात्रा ( ८ ) ८

नामें दोष जळती । नामें पापी उद्धरती ॥ १ ॥
हें तों आलें अनुभवा । सत्य जीवा प्रत्यया ॥ २ ॥
नामें अपार तारिले । नामें जीवन्मुक्त केले ॥ ३ ॥
**कान्हुपात्रा** नाम घेतां । पायीं जडली तत्वता ॥ ४ ॥

सावतामाळी ( ९ ) ९

नामाचिया बळें न भीऊं सर्वथा । कळिकाळाच्या माथां सोटे मारूं ॥ १ ॥
वैकुंठींचा देव आणूं या कीर्तनीं । विठल गाउनी नाचों रंगीं ॥ २ ॥
सुखाचा सोहोळा करूनि दिवाळी । प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ॥ ३ ॥
**सावता** म्हणे ऐसा भाक्तिमार्ग धरा । तेणें मुक्ति द्वारां वोळंगती ॥ ४ ॥

सेनान्हावी ( १० ) १०

असाल तेथें नामाचें चिंतन । याहूनी साधन आणीक नाहीं ॥ १ ॥
सोडवील माझा भक्तांचा कैवारी । प्रतिज्ञा निर्धारीं केली आम्हीं ॥ २ ॥
गुणदोषयाती न विचारी कांहीं । धांवे लवलाहीं भक्तकाजा ॥ ३ ॥
अवघे काळीं वाचे म्हणा नारायण । **सेना** म्हणे क्षण जाऊं न द्या ॥४॥

नरहरि सोनार ( ११ ) ११

नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरीरायाचें ॥ १ ॥
नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥ २ ॥
नाम संताचें माहेर । प्रेमसुखाचें आगर ॥ ३ ॥
नाम सर्वांमध्यें सार । जपे **नरहरि सोनार** ॥ ४ ॥

श्रीएकनाथ ( १२-१५ ) १२

नाम वदतां वैखरी । चित्त धांवे विषयांवरी ॥ १ ॥
कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥
नामरूपा नाहीं मेळ । नुसता वाचेचा गोंधळ[1] ॥ ३ ॥
**एका जनार्दनीं** नाम । नामीं प्रगटे आत्माराम[2] ॥ ४ ॥

---

१ ज्याचें ध्यान करावयाचें तद्‌ाकार चित्तवृत्ति झाली पाहिजे. २ नाथ म्हणतात, मी नामस्मरण करितों तेव्हां साक्षात् परमात्मा प्रकटतो.

१३

नाम मुखीं गातां विषयाची वार्ता । नोहेचि सर्वथा गातयासी ॥ १ ॥
नाम तें पावन नाम तें पावन नामावांचून जाण श्रेष्ठ कोण ? ॥ ध्रु० ॥
**एका जनार्दनीं** नाम तें पावन । त्रिभुवनीं मंडन नाम सत्य ॥ २ ॥

१४

नामधारक हो कां भलता । त्याचे चरणीं ठेविन माथा ॥ १ ॥
न म्हणे उत्तम अधम । मुखीं जपतां रामनाम ॥ ध्रु० ॥
यातिकुळाचें कारण । नाहीं नाहीं नामाविण ॥ २ ॥
नाम जपे तोचि श्रेष्ठ **एका जनार्दनीं** वरिष्ठ ॥ ३ ॥

१५

वाचे विठ्ठल बोलावें । पुढें पाऊल टाकावें ॥ ध्रु० ॥
ऐसा ज्याचा नेमधर्म । मुखीं विठ्ठलाचें नाम ॥ १ ॥
सर्वकाळ वाचे । विठ्ठलनाम वदती साचें ॥ २ ॥
कुळधर्म आमुचा । म्हणे **एका** जनार्दनाचा ॥ ३ ॥

श्रीरामदास ( १६–१७ )

१६

रामनामकथा गंगा । स्मरणें पावन करी जगा ॥ १ ॥
तिर्शीं प्रेमपूर आला । शंकरहृदयीं सामावला ॥ ध्रु० ॥
**रामदासा**ची माउली । आळशावरी गंगा आली ॥ २ ॥

१७

धन्य धन्य तें नगर । जेथें कथा निरंतर ॥ १ ॥
गुण गाती भगवंताचे । तेचि मानावे दैवाचे ॥ ध्रु० ॥
स्वयें बोले जगजीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥ २ ॥
**रामदास** म्हणे भले । हरिभक्तीं उद्धरले ॥ ३ ॥

---

१ भक्तांचा शुभ मुहूर्त हाच ! मंगलांच्या मंगलास चित्तीं चिंतणाऱ्यांना अमंगल **कांहींच** नाहीं !

श्रीतुकाराम ( १८–२६ ) १८

ब्रह्मरस घेई काढा । तेणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें । आणिक वाचे ! न सेवीं ॥ ध्रु० ॥
भवरोगाऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ॥ २ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा । आणिक कदा भूतांची ॥ ३ ॥

१९

सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेउनि नाचा ॥ १ ॥
समाधीचें सुख सांडा ओवाळूनी । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥ ध्रु० ॥
पुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ २ ॥
उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति चारी दासी हरिदासांच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे मन पावोनी विश्रांती । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ४ ॥

२०

नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥
दोचि अक्षरांचें काम ॥ उच्चारावा रामराम ॥ ध्रु० ॥
नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींच सरतीं ॥ २ ॥
तुका म्हणे नाम । चैतन्यनिजधाम ॥ ३ ॥

२१

राम म्हणे वाटचाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ १ ॥
धन्य धन्य तें शरीर । तीर्थव्रतांचें माहेर ॥ ध्रु० ॥
राम म्हणे करितां धंदा । सुखसमाधी त्या सदा ॥ २ ॥
राम म्हणे ग्रासोग्रासीं । तोचि जेविला उपवासी ॥ ३ ॥
राम म्हणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ४ ॥
ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तो जीवन्मुक्त ॥ ५ ॥

२२

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरिंचीं ॥ १ ॥
नलगे सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ ध्रु० ॥

---

१ देवाचें राहतें घर. २ ‘ हरीचिंतनीं अन्न सेवीत जावें ’–रामदास.

ठायींच बैसोनि करा एक चित्त । आवडी अनंत आळवावा ॥ २ ॥
रामकृष्णहरि विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळें ॥ ३ ॥
यावीण आणीक नाहीं पैं साधन । वाहतसें आण विठोबाची ॥ ४ ॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहुनी । शहाणा तो धणी घेतो तेथें ॥ ५ ॥

२३

आतां सर्वभावें हा माझा निर्धार । न करीं विचार आणिकांसी ॥ १ ॥
सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ ध्रु० ॥
लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहीन भरोनी डोळे मुख ॥ २ ॥
निर्लज्ज होऊनी नाचेन रंगणीं । येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ३ ॥
अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ४ ॥

२४

बैसोनी निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥
येउनी अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलीयां ॥ ध्रु० ॥
राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारीं वेळोवेळां ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल भाव एकविध ॥ ३ ॥

२५

रामनामाचे पोवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥
धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ ध्रु० ॥
रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ २ ॥
तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्ही ॥ ३ ॥

२६

वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधिला ॥ १ ॥
विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥ ध्रु० ॥
सकळ शास्त्रांचा विचार । अंतीं इतुकाचि निर्धार ॥ २ ॥
अठरा पुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत ॥ ३ ॥

---

१ नामस्मरणाला काळवेळ नाहीं.

## २ वामनी श्लोक.

अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां
सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां ।
घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं
समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन[1] करीं ॥ १ ॥
हरिचरणसरोजीं चित्सुधासारपानें[2]
भ्रमर परमयोगी गुंजती नामगानें ।
हरति सकळ दुःखें, हीं सुखाचीं निधानें[3]
वद वद वद जिव्हे ! रामनामें रसानें[4] ॥ २ ॥
न कळतां पद अग्निवरी पडे । न करि दाह असें न कधीं घडे ॥
अजितनाम वदो भलत्या मिसें[5]। सकल पातक भस्म करीतसे॥३॥
न जाणतहि ये मुखा हरि तथापि पापें हरि
स्मरोनि महिमा स्मरे वदनिं तींच नामें जरी ।
प्रवृत्तिविषयीं जरी असति त्यां जनांचीं मनें
विरक्त करितो हरि स्वगुणनामसंकीर्तनें ॥ ४ ॥

---

## दोहरे.

माला तो करमे फिरे जिभ्या फिरे मुख[6]माहे ।
मन तो दाही दिस फिरे इह तो सुमरन[7] नाहे ! ॥ १ ॥
ओठ कंठ हाल नही जिभ्या स्मरे न नाम ।
राम हमारा जप करे हम् बैठे आराम ! ॥ २ ॥
रामनाम सबकुहि कहे ठक ठाकुर और चोर ।
जिस नामसे ध्रुव प्रऱ्हाद तरे वो नाम कुच और ॥३॥ (कबीर)
रामनाम मणिदीप धरू जीहँ देहलीद्वारें ।
तुलसी भीतरबाहिरौ जो च्याहसि उजियार ॥४॥ (तुळसीदास)
मुये मढेसे हेत क्या जो जीवकु जाने नाहे ।
हेत हरीसो कीजिये रहे जो अंतरमाहे ॥ ५ ॥ ( दादुपिंजारी )

---

१ अंतररंग नाम बोलावें. २ ज्ञानामृतपानानें. ३ घरें, आगरें. ४ प्रीतीनें. ५ कोणत्याही निमित्तानें. ६ मुखामध्यें. ७ हें स्मरण नव्हे ! ८ जीभ. ९ उंबरठा. १० उजेड, प्रकाश.

# ६ परमार्थपरविचार.

काळ चोर घिरट्या बहु घाली । पामरा तुज कशी निज आली ? ॥
जाग जाग स्वरूपीं लवलाह्या । जातसे वय अमोलिक वायां ॥ १ ॥

## १ प्रपंचांतील वागणूक.

देनेकू अन्नपान लेनेकू हरिनाम ।
तरनेकू लीनता डुबनेकू अभिमान ! ! ॥

१

काळ जातो क्षणक्षणा । मूळ येईल मरणा ॥ १ ॥
कांहीं धांवाधांव करी । जंव तो काळ आहे दुरी ॥ २ ॥
देह आहे जाईजणें । भुललासि कवण्या गुणें ॥ ३ ॥
मायाजाळीं गुंतलें मन । परि हें दुःखासी कारण ॥ ४ ॥
सत्य वाटतें सकळ । परी जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
**रामीरामदास** म्हणे । आतां सावधान होणें ॥ ६ ॥

२

ऐसें असावें संसारीं । जोंवरि प्राचीनाची दोरी ॥ १ ॥
पक्षी आंगणासी आले । आपुला चारा चरोनि गेले ॥ २ ॥
मुलीं घरचार मांडिला । खेळ मोडोनि टाकिला ॥ ३ ॥
वाटसरू वाटा आले । प्रातःकाळीं उठोनि गेले ॥ ४ ॥
मार्गीं बहुसाल भेटले । तेथें मन नाहीं गुंतलें ॥ ५ ॥
**एका** विनवी जनार्दना । ऐसें असतां भय कोणा ! ॥ ६ ॥

३

जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे । बा अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
झाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनियां पळती रांडापोरें ॥ २ ॥
बाईल म्हणे खर मरता तरी बरें । नासलें हें घर थुंकोनियां ! ॥ ३ ॥
**तुका** म्हणे माझीं न होत हीं कोणी । तुज चक्रपाणी वांचोनियां ! ॥ ४ ॥

४

देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सुख क्षणि क्षणभंगुर ॥ १ ॥
अविनाश जोडी देवापाशीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ ध्रु० ॥
क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघें नासे ॥ २ ॥
तुका म्हणे येथें सकळ विश्रांति । आठवावा चित्तीं नारायण ॥ ३ ॥

५

हेचि थोर भक्ती आवडते देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ ध्रु० ॥
वाहिल्या उद्वेग दुःखचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ २ ॥
तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥ ३ ॥

६

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदासविचारें वेंच करी ॥ १ ॥
उत्तमची गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥ ध्रु० ॥
परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणीमायी ॥ २ ॥
भूतदया गाईपशूंचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामार्जी ॥ ३ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥ ४ ॥
तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ५ ॥

७

बहुता छंदांचें बहु वसे जन । नये वांटूं मन त्यांच्या संगें ॥ १ ॥
करावा जतन आपुला विश्वास । अंगा आला रस आवडीचा ॥ ध्रु० ॥
सुखाची समाधी हरिकथामाउली । विश्रांति साउली शिणलियांची ॥ २ ॥
तुका म्हणे बुडे बांधोनि दगड । तेथें काय कोड धांवायाचें ॥ ३ ॥

८

पराविया नारी माउलीसमान । मानिलीया धन काय वेंचे ? ॥ १ ॥
न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष । काय तुमचें यास वेंचे सांगा ?॥ध्रु०॥
बैसलिये ठायीं म्हणतां राम राम । काय होय श्रम ऐसें सांगा ? ॥ २ ॥
संतांच्या वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेंचे सांगा ? ॥ ३ ॥

---

१ संसाराचें ममत्व सोडून तो हरीचा आहे असा निश्चय करावा.

खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेंचे यास ऐसें सांगा ? ॥ ४ ॥
**तुका** म्हणे देव जोडे याजसाठीं । आणीक ते आटी नलगे कांहीं ॥ ५ ॥

९

भावें गावें गीत । शुद्ध करोनियां चित्त ॥ १ ॥
जरि व्हावा तुज देव । तरि हा सुलभ उपाव ॥ ध्रु० ॥
आणिकांचे कानीं । गुणदोष मना नाणीं ॥ २ ॥
मस्तक ठेंगणा । करी संतांच्या चरणा ॥ ३ ॥
**तुका** म्हणे फार । थोडा करीं परउपकार ॥ ४ ॥

१०

एक शेर अन्ना चाड । येर वाउगी बडबड ॥ १ ॥
कां रे तृष्णा वाढविसी । बांधवूनी मोहपाशीं ॥ ध्रु० ॥
औट हात तुझा जागा । येर शिणसी वाउगा ॥ २ ॥
**तुका** म्हणे श्रम । एक विसरतां राम ॥ ३ ॥

११

क्षणाक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणा रे सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥ ध्रु० ॥
संतसमागमीं धरूनी आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥ २ ॥
**तुका** म्हणे इहलोकींच्या[1] वेव्हारें । नये डोळे धुरें भरोनि राहो ॥ ३ ॥

१२

नामसंकीर्तन सर्वकाळ जया । भक्तिवंत तया म्हणो आम्ही ॥ १ ॥
क्षण एक नाहीं नामेवीण वाचा । सोस हा भक्तीचा सर्वकाळ ॥ ध्रु० ॥
नेत्रीं हरिध्यान मुखीं तें कीर्तन । सर्वदा श्रवण मोक्षशास्त्रें ॥ २ ॥
सेवा घडे हातें पायीं प्रदक्षिणा । विश्रांती धारणा आत्मयाची ॥ ३ ॥
आठही प्रहर नाहीं आराणूक । संतांघरीं रंक होउनि ठेला ॥ ४ ॥
**बाहिणी**[2] म्हणे भक्ति खरी मोक्षदाती । पाहिजे संगती संतसेवा ॥ ५ ॥

---

१ राजस व तामस प्रपंचवृत्तींनीं डोळ्यांवर झांपड येऊं देऊं नका, आंधळे बनूं नका. २ तुकोबांची अनुग्रहीत बहिणाबाई शिरूरकर यांचा हा अभंग आहे.

## २ आचार्यांचा उपदेश.

संगः सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढा धीयतां
शांत्यादिः परिचीयतां दृढतरं कर्माशु संत्यज्यताम् ।
सद्विद्वानुपसर्प्यतां प्रतिदिनं तत्पादुके सेव्यतां
ब्रह्मैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम् ॥ १ ॥

## ३ सुविचारमाला.

प्रापंचीं ममता कधीं धरूं नको, लोभांत गुंतूं नको,
लोकीं तूं खळ दुष्ट नष्ट, भलत्या संगांत बैसूं नको, ।
कांहीं कर्म करूं नको, गुरुमहापंथासि मोडूं नको,
जो कोणी भवदुःख सर्व निरसी तो देव सोडूं नको ॥ १ ॥
संसारीं असतां प्रवाहपतितद्वंद्वांसि त्रासूं नको
खेदाखेद मनांत आणुनि वनीं जाणें विचारूं नको ।
कर्णीं दुष्ट कठोर शब्द पडती तें दुःख मानूं नको
भोगें दुःखसुखादि सारुनि निजानंदास भंगूं नको ॥ २ ॥
लाभीं हर्ष नको, विषादहि नको, निंदा-प्रशंसा नको
हानीचा मनिं शोक तूं धरुं नको, देहीं अहंता नको ।
कोणाचें इतिकृत्य तें स्मरुं नको, माझें तुझें हें नको
आप्तांसी ममता नको, गुरुपरब्रह्मासि सोडूं नको ॥ ३ ॥
प्रारब्धीं सुखभोगयोग नसतां तें दैन्य मानूं नको
इंद्राची बहु संपदा गणुं नको, क्षुद्रार्थ वांछूं नको ।

---

१ मृगाच्या आवडीनें जडभरत कसा गुंतला तें भागवतांत सांगितलें आहे. 'ममतेपाशीं असे मरण'—एकनाथ. २ 'लोभमूलानि पापानि' ३ सकाम कर्म करूं नको; कर्तेपणाचा अभिमान अंगीं वाजूं देऊं नकोस. ४ सुखदुःखें भोगून संपाव, समर्थांनीं हिंव घोंगडींत घालून ठेविलें व रंगनाथ गेल्यावर ते कडकडूं लागले याचें बीज हेंच आहे. कर्मफळ भोगल्याशिवाय सुटत नाहीं. भोगानंतरच त्याग होतो. ५ संसारांत जास्त अडकविनात म्हणून !

देहाचें कृतकर्मदुःख आपुलें कोणास सांगूं नको
भूलोकांत महाप्रसंग पडतां तूं सत्त्व सोडूं नको ! ! ॥ ४ ॥
मायामोह नको, सुसंग असतां सोडूनि जाऊं नको,
चिंताशोक नको, परार्थ करितां लोकांस लाजूं नको, ।
वर्मोच्चार नको, जनांत बसतां गोष्टी भवाच्या नको,
चित्तीं राग नको अनावर, खरें वैराग्य सोडूं नको, ॥ ५ ॥
नानाचार नको, कुकर्म करणें हे क्षुद्रबुद्धी नको,
मायाकल्पित वित्तवाजिकरि हे भोगार्थ वांछूं नको,
कायक्लेश नको, जनीं मुढ अशा संगांत बैसूं नको,
‘ जेथें[1] जाउनि येत ना मुनि कदा तें धाम सोडूं नको ’ ॥ ६ ॥

—नारायणचोवा.

## ४ श्रीसमर्थकृत मनास बोध.

मना ! सज्जना भक्तिपंथेंचि जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं[2] निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ १ ॥
मना वासना दुष्ट कामा नये रे । मना सर्वथा[3] पापबुद्धी नको रे ॥
मना धर्मता[4] नीति सोडूं नको हो । मना अंतरीं सार[5]वीचार राहो ॥ २ ॥
नको रे मना क्रोध हा खेदकारी । नको रे मना काम नानाविकारी ॥
नको रे मना सर्वथा अंगिकारूं । नको रे मना मत्सरू दंभभारू ॥ ३ ॥
मना श्रेष्ठ [6]धारिष्ट जीवीं धरावें । मना बोलणें नीच सोशीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्रवाचें वदावें । मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ ४ ॥

---

१ ‘ यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ’ २ जन म्ह० सामान्य जन नाहीं, तर सज्जन. महाजन निंद्य कोणतें व वंद्य कोणतें हें संतसाधूंनीं ठरविल्याप्रमाणें समजावें. ‘ महाजनो येन गतः स पंथाः ’ अशी व्यासोक्ति आहे. सदाचार म्ह० संतांचा आचार, त्यांचा मार्ग धरावा. ३ मुळींच. ४ धर्मनिष्ठा. ५ माया असार, व ब्रह्म सार; त्या ब्रह्माचें चिंतन. ६ आघाताला टिकणारे. ७ “ म्हणोनि दुर्वाक्य न बोलावें । पराचें आपण साहात जावें । याहूनि श्रेष्ठ साधन बरवें । भुवनत्रयीं असेना ॥ ” मुक्तेश्वर.

देह त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रिया धरावी ॥
मना चंदनाचे परी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें ॥ ५ ॥

सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी । दुखाची स्वयें सांड जीवीं करावी ॥
देहेदुःख तें सूख मानीत जावें । विवेकें सदा स्वस्वरूपीं भरावें ॥ ६ ॥

जनीं सर्वसूखी असा कोण आहे । विचारें मना तूंचि शोधूनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें । तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ७ ॥

मना मानसीं दुःख आणूं नको रे । मना सर्वथा शोकचिंता नको रे ॥
विवेकें देहेबुद्धि सोडूनि द्यावी । विदेहापणें मुक्ति भोगीत जावी ॥ ८ ॥

मरे एक त्याचा दुजा शोक वाहे । अकस्मात तोही पुढें जात आहे ॥
पुरेना जनीं लोभ रे क्षोभ त्यातें । म्हणोनी जनीं मागुता जन्म घेतें ॥ ९ ॥

सदा सर्वदा देव सन्नीध आहे । कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥
सुखानंद आनंद कैवल्यदानी । नुपेक्षी कदा रामदासाभिमानी ॥ १० ॥

मना रे जनीं मौन्यमुद्रा धरावी । कथा आदरें राघवाची करावी ॥
नसे राम तें धाम सोडोनि द्यावें । सुखालागिं आरण्य सेवीत जावें ॥११॥

सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा । सदा रामनामें वदे नित्य वाचा ॥
स्वधर्मेचि चाले सदा[१] उत्तमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥१२॥

सदा बोलण्यासारिखें चालताहे । अनेकीं सदा एक देवासि पाहे ॥
सगूणीं भजे लेश नाहीं तमाचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥१३॥

क्रमी वेळ जो तत्वचिंतानुवादें । न लिंपे कदा दंभवादें[१] विवादें ॥
करी सूखसंवाद जो ऊगमाचा[१] । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १४ ॥

दिनाचा दयाळू मनाचा मवाळू । स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू ॥
तया अंतरीं क्रोधसंताप कैंचा । जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ १५ ॥

---

१ " आपुला आपण स्वानंद । कोणावरी करावा मद । याकारणें वादवेवाद । तुटोनि गेला ॥ " ( दासबोध ८-९-२८ ). १ आत्मस्वरूपाचा, आदितत्वाचा.

न वेंचे कदा ग्रंथिंचा अर्थ कांहीं । मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं ॥
महा घोर संसारशत्रू जिणावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥१६॥
नव्हे कर्म ना धर्म ना योग कांहीं । नव्हे भोग ना त्याग ना सांग[2] कांहीं ॥
म्हणे दास विश्वास नामीं धरावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥१७॥
बहू चांगलें नाम या राघवाचें । अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें ॥
करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें । जिवा मानवा हेंचि कैवल्य[3] साचें ॥१८॥
विवेकें क्रिया आपुली पालटावी । अती आदरें शुद्ध क्रीया धरावी ॥
जनीं बोलण्यासारिखें चाल बापा । मना कल्पना सोडिं संसारतापा ॥१९॥
बरी स्नानसंध्या करीं एकनिष्ठा । विवेकें मना आवरी स्थानभ्रष्टा ॥
दया सर्वभूतीं जया मानवाला । सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला ॥ २० ॥
तुटे वाद संवाद तेथें करावा । विवेकें अहंभाव हा पालटावा ॥
जनीं बोलण्यासारिखें आचरावें । क्रियापालटें भक्तिपंथेंचि जावें ॥ २१ ॥
फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे । दिसेंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे । विचारें मना तूंचि शोधोनि पाहें ॥२२॥
जगीं धन्य तो रामसूखें निवाला । कथा ऐकतां सर्व तल्लीन झाला ॥
देहेभावना रामबोधें उडाली । मनोवासना रामरूपीं विराली ॥ २३ ॥
नसे गर्व अंगीं सदा वीतरागी । क्षमाशांतिभोगी दयादक्षयोगी ॥
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा । यहीं लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥२४॥
दिसे लोचनीं तें नसे कल्पकोडी । अकस्मात आकारलें काळ मोडी ॥
पुढें सर्व जाईल कांहीं न राहे । मना संत आनंत[5] शोधोनि पाहे ॥ २५ ॥
जेणें मक्षिका भक्षिली जाणिवेची । तया भोजनाची रुचि प्राप्त कैंची ॥
अहंभाव ज्या मानसींचा विरेना । तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना ॥२६॥

१ गांठीचा पैसा. 'नाम घेतां नलगे मोल'—तुकाराम. २ यथासांग, विधिपूर्वक. ३ मोक्ष, ज्ञान. ४ लवण जलांत तशी विरघळून गेली. ५ शाश्वत, नित्य 'यत् दृष्टं तत् नष्टं.'

अहंतागुणें सर्वही दुःख होतें । मुखें बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें ॥
सुखीं राहतां सर्वही सूख आहे । अहंता तुझी तूंचि शोधोनि पाहें ॥२७॥
देहेबुद्धि ते ज्ञानबोधें त्यजावी । विवेकें तया वस्तुची भेटि घ्यावी ॥
तदाकार हे वृत्ति नाहीं स्वभावें । म्हणोनी सदा तेंचि शोधीत जावें ॥२८॥
सदा सर्वदा राम सन्नीध आहे । मना सज्जना सत्य शोधूनि पाहें ॥
अखंडीत भेटी रघूराजयोगू । मना सांडिं रे मीपणाचा वियोगू ॥ २९ ॥

### पूजेनंतर तीर्थोदक घेतांना श्रद्धेनें म्हणावयाचे मंत्र.

अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम् ।
विष्णुपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ॥ १ ॥
शरीरे जर्जरीभूते व्याधिग्रस्ते कलेवरे ।
औषधं जाह्नवीतोयं वैद्यो नारायणो हरिः ॥ २ ॥

### भोजनसमयीं ठेवावयाची भावना.

ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ १ ॥
हरिर्दाता हरिर्भोक्ता हरिरन्नं प्रजापतिः ।
हरिर्विप्रशरीरस्तु भुंक्ते भोजयते हरिः ॥ २ ॥
एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः
त्रीन् लोकान्व्याप्य भूतात्मा भुंक्ते विश्वभुगव्ययः ॥ ३ ॥
जनीं भोजनीं नाम वाचे वदावें । अती आदरें गद्यघोषें म्हणावें ।
हरीचिंतनें अन्न सेवीत जावें । तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥ ४ ॥
वदनिं कवळ घेतां नाम घ्या श्रीहरीचें
सहज हवन होतें नाम घेतां फुकाचें ।
जिवन करि जिवित्वा अन्न हें पूर्ण ब्रह्म
उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म ॥ ५ ॥

---

# अमृतबिंदुशतक.

( श्रीज्ञानदेव, श्रीतुकाराम, श्रीरामदास व श्रीएकनाथ यांच्या मुखगंगेंतून स्रवलेले. )

## १ श्रीज्ञानेश्वर.

( १ ) देखा नवल तया प्रभूचें । अद्भुत प्रेम भक्ताचें ।
जो सारथ्यपण पार्थाचिं । करित असे ॥

( २ ) हे उपजे आणि नाशे । तें मायावशें दिसे ।
येरवीं तत्वता वस्तु जे असे । ते अविनाशचि ॥

( ३ ) या उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।
तत्वज्ञ सतत । स्वीकारिती ॥

( ४ ) अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ॥

( ५ ) म्हणानि जें जें उचित । आणि अवसरेंकरूनि प्राप्त ।
तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥

( ६ ) एथ वडिल जें जें करिती । तया नाम धर्म ठेविती ।
येर तेंचि अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥

( ७ ) मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।
अलौकिक नोहावें । लोकांप्रती ॥

( ८ ) हें मजचिस्तव जाह्लें । परी म्यां नाहीं केलें ।
ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा ॥

( ९ ) मनाचा मार न करितां । इंद्रियां दुःख न देतां ।
एथ मोक्ष असे आयता । श्रवणाचिमाजी ॥

( १० ) तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता ।
परमात्मा परौता । दूर नाहीं ॥

---

१ परब्रह्म. २ दृश्य सृष्टि. ३ मार्गास.

( ११ ) दैवास्तव पाळण । जो चिंतीना देहभरण ।
तो महायोगी जाण । दैवयोगें ॥

( १२ ) शन्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह ।
तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीन ॥

( १३ ) म्हणोनि कल्पना जें सांडे । तेंचि गा संन्यास घडे ।

( १४ ) जैसा किडाळीचा दोष जाये । तरी पंधरें तेंचि होये ।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥

( १५ ) जे विश्वाळंकाराचे विसुरे । जरी आहाति आनानें आकारें ।
तरी घडले एकेंचि भांगारें । परब्रह्में ॥

( १६ ) म्हणोनी आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे ।
ऐसें साम्याचि एक उपासिजे । पांडवा गा ॥

( १७ ) यया **मना**चें एक निकें । जे देखिलें गोडीचिया ठायां सोकें ।
म्हणोनी अनुभवसुखाचि कवतिकें । दावीत जाइजे ॥

( १८ ) तेविं सद्भ्यास निरंतर । चित्तासि परम पुरुषाची मोहर ।
लावी, मग शरीर । राहो अथवा जावो ॥

( १९ ) यालागीं सुमन आणि शुद्धमती । जो अनिंदक अनन्यगति ।
पैं गा गोप्यही परी तयाप्रती । चावळिजे सुखें ॥

( २० ) तैसा हृदयामध्यें मी राम । असतां सर्व सुखाचा आगम ।
कां भ्रांतासी काम । विषयांवरी ? ॥

( २१ ) ऐसिया प्रतीतिबोधसागरीं । तूं आपणयातें कल्लोळ करीं ।
मग जंव पाहसी चराचरीं । तंव तूंचि आहासी ॥

( २२ ) तैसा स्वरूपाचिया प्रसरा–। लागीं प्राणेंद्रियशरीरा ।
आटणी करणें जें वीरा । तेंचि **तप** ॥

( २३ ) पैं आपलेनि भेदेंवीण । माझें जाणणें जें एकपण । तयाचि नांव शरण।
मज येणें गा ॥ १ ॥ सुवर्णमाणि सोनया । ये कल्लोळ जैसा पाणिया ।
तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥ २ ॥

( २४ ) म्हणोनि थोरपण पर्‍हां सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळिक माझी ॥

---

१. हिणकस सोनें. २ प्राप्तीसाठीं. ३ पलीकडे, दूर.

( २५ ) तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे ।
जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥
( २६ ) म्हणोनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥
( २७ ) विषयविषाचा पैडिपाडू । गोड परमार्थ वाटे कडू ।
कडू विषय तो गोडू । जीवासि जाहला ॥
( २८ ) नवल अहंकाराची गोठी । विशेषे नलगे अज्ञानापाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥

## २ श्रीतुकाराम.

( २९ ) नलगे हा लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥
( ३० ) सुख पाहतां जवापाडें । दुःख पर्वताएवढें ॥
( ३१ ) न फळे उत्तर । नाहीं स्वामी जो सादर ॥
( ३२ ) करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ? ॥
( ३३ ) चित्तीं नाहीं आस । त्याचा पांडुरंग दास ॥
( ३४ ) वैष्णव तो जया । अवघी देवावरी माया ॥
( ३५ ) नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥
होंचि शूरत्वाचें अंग । हारी आणिला श्रीरंग ॥ २ ॥
( ३६ ) शुद्धचर्या होंचि संतांचें पूजन । लागताचि धन नाहीं वित्त ॥ १ ॥
( ३७ ) तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी ।
चिवडुनियां नासीं । तुझ्या घरच्यांनीं केली ॥
( ३८ ) विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ १ ॥
तुका म्हणे भोळीयाचा । देव साचा अंकित ॥ २ ॥
( ३९ ) देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥
( ४० ) नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म ।
आणिक न करावे श्रम । पुरे एक नाम विठोबाचें ॥
( ४१ ) भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज भज ॥
( ४२ ) तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तिहीं त्रिभुवनीं ॥
( ४३ ) तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥
( ४४ ) भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥

---

१ पराक्रम. २ परमात्मा जोंवर बोलला नाहीं तोंवर वाणीला अमोघत्व नाहीं. ३ भक्त. ४ शरीरांतल्या कामक्रोधादि विकारांनीं.

( ४५ ) वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥
( ४६ ) द्रव्याचिया मागें कळिकाळाचा लाग । म्हणोनियां संग खोटा त्याचा ॥
( ४७ ) विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनी जो दुरी तो सोंवळा ॥
( ४८ ) साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ॥
( ४९ ) तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वायां न वजे ॥
( ५० ) देव जोडे ते करावे अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावें ॥
( ५१ ) पोटापुरतें काम । परी अगत्य तो राम ॥
( ५२ ) आला भागासी तो करी वेवसाय । परी राहो भाव तुझ्या पायीं ॥
( ५३ ) दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥
( ५४ ) तुका म्हणे कांहीं नाहीं नेमाविण । मोकळा[1] तो सीण दुःख पावे ॥
( ५५ ) आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्व जनां ॥
( ५६ ) सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥
( ५७ ) तुका म्हणे हरिच्या दासा । शुभकाळ दाही दिशा ॥
( ५८ ) वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें । पक्षीही सुस्वरें आळवीती ॥ १ ॥
येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुणदोष अंगा येत ॥ २ ॥
( ५९ ) निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुण प्रतिपाळी ॥
( ६० ) मन हें निश्चळ झालें एक ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥
( ६१ ) ब्रह्मरस करूं भोजनपंगति । संतांचें संगति सर्वकाळ ॥
( ६२ ) भक्तीची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥
( ६३ ) चित्त शुद्ध जरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥
( ६४ ) कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांच उणें असे ? ॥
( ६५ ) पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥
( ६६ ) प्रेमें अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥
( ६७ ) भक्तीच्या उत्कर्षे[2] । नाहीं मुक्तिचें तें पिसें ॥
( ६८ ) वासनेची बुंथी । तेथें कैंची ब्रह्मस्थिति ? ॥
( ६९ ) निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥
( ७० ) तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥
नाहीं तरी काय थोडीं । श्वानसूकरें बापुडीं ? ॥

---

१ नियमहीन, स्वच्छंदी. २ घुंगट, वेष्टन.

( ७१ ) तुका म्हणे थोडें आहे । आली उर्मी साहुनि राहे[1] ॥
( ७२ ) दुजे खंडे तरी । उरला तो अवघा हरी ॥
आपणाबाहेरी । नलगे ठाव धुंडावा ॥

## ३ श्रीरामदास.

( ७३ ) नरदेहाचें उचित । कांहीं करावें आत्महित ।
यथानुशक्त्या चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावें ॥ १ ॥
( ७४ ) संसारदुःख विसरवी । भक्तिमार्ग विमल दावी ।
भजनक्रिया जो उपजवी । तो सत्वगुण ॥ २ ॥
( ७५ ) मूर्खामाजी परम मूर्ख । जो संसारीं मानी सुख ।
या संसारदुःखाएवढें दुःख । आणीक नाहीं ॥ ३ ॥
( ७६ ) जो अन्न देतो उदरासी । शरीर विकावें लागे त्यासी ।
मां जेणें घातलें जन्मासी । त्यासि कैसें विसरावें ? ॥ ४ ॥
( ७७ ) जो संसारदुःखें दुखावला । जो त्रिविधतापें पोळला ।
तोचि एक अधिकारी झाला । परमार्थासी ॥ ५ ॥
( ७८ ) सद्गुरुहूनि देव मोठा । जयास वाटे तो शिष्य करंटा ।
( ७९ ) संसारसंगें सुख जाह्लें । ऐसें देखिलें ना ऐकिलें ॥
( ८० ) जो जाणेल भगवंत । तया नांव बोलिजे **संत** ॥
जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥ ६ ॥
( ८१ ) पोट भरायाची विद्या । तियेसी म्हणो नये सद्विद्या ।
सर्वव्यापक वस्तु सद्या[1] । पाविजे तें ज्ञान ॥ ७ ॥
( ८२ ) संसारत्याग न करितां । प्रपंच उपाधी सांडतां ।
जनांमध्यें सार्थकता । विचारेंचि होणें ॥ ८ ॥
( ८३ ) गुप्त तेंचि प्रगटवावें । असाध्य तेंचि साधावें ।
कानेडेंचि[2] अभ्यासावें । निरंतर ॥ ९ ॥
( ८४ ) देहबुद्धीच्या अंतीं । सकळांसि एकचि प्राप्ती ॥
( ८५ ) परी परत्रसाधनेंवीण । म्हणों नये तें श्रवण ।
जेथें नाहीं आत्मज्ञान । तया नांव कर्मणी[3] ॥ १० ॥

---

१ तात्काळ परमात्म्याची जी भेट करविते ती सद्विद्या व तेंच ज्ञान. २ कठिण असाध्य वाटणारें. ३ कालक्रमण.

## ४ श्रीएकनाथ.

( ८६ ) दारा सुत गृह प्राण । करावे भगवंतासी अर्पण ।
हे **भागवतधर्म** पूर्ण । मुख्यत्वें भजन या नांव ॥ १ ॥
( ८७ ) हरिचरणीं अपरोक्षस्थिति । तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती ।
त्यापुढें त्रिभुवनविभवसंपत्ति । **भक्त** मानिती तृणप्राय ॥ २ ॥
( ८८ ) सकळ योगांचें योगगव्हर । वेदांतनिजभांडार ।
सकळ सिद्धीचें परम सार । **भक्ति** साचार हरीची ॥ ३ ॥
( ८९ ) भजमाजी रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती ।
त्यासी गृहाश्रमींच माझी प्राप्ती । निश्चयें जाण उद्धवा ॥ ४ ॥
( ९० ) भरतखंडीं नरदेहाप्रती । हे परम भाग्याची संपत्ति ।
तेथेंही विवेकु परमार्थी । त्याचा वशवर्ती मी परमात्मा ॥ ५ ॥
( ९१ ) स्वकर्मधर्म वर्णाचार । करितांही निजव्यवहार ।
ज्यासी सर्वभूतीं मदाकार । तो **भक्त** साचार प्रिय माझा ॥ ६ ॥
( ९२ ) **भक्ति** म्हणजे सर्वांभूतीं । सप्रेम भजनयुक्ती ।
**प्राप्ती** म्हणजे परोक्षास्थिति । भगवत्स्फूर्ती अनिवार ॥ ७ ॥
( ९३ ) प्रवाहरूपें अनिवार । जीवभाव लागला थोर ।
त्यातें जिंकी जो महावीर । तो परम **शूर** बोलिजे ॥ ८ ॥
( ९४ ) अन्नवस्त्र दानमान । पोटींच्या कळवळ्यानें जाण ।
करावें भूतीं प्रियाचरण । हा **स्वधर्म** जाण सर्वांचा ॥ ९ ॥
( ९५ ) जीव परमात्मा दोनी एक । ऐसें जाणणें तें **ज्ञान** देख ।
ऐक्य भोगणें परमात्मसुख । **विज्ञान** सम्यक त्या नांव ॥ १० ॥
( ९६ ) मी कर्मा आदिमध्यअंतीं । मी कर्म कर्ता क्रियाशक्ती ।
कर्मफळदाता मी श्रीपती । हा इत्यर्थ निश्चिती **कर्मकांडींचा** ॥ ११॥
( ९७ ) पिता स्वयमेव नारायण । माता प्रत्यक्ष लक्ष्मी आपण ।
ऐसें भावें ज्याचें भजन । **सुपुत्र** जाण तो एक ॥ १२ ॥
( ९८ ) वैष्णवीं मानी जाति प्रमाण । शालिग्राम मानी पाषाण ।
सद्गुरूसी मानी माणुसपण । तो पापिष्ट जाण सर्वथा ॥ १३ ॥
( ९९ ) जेणें आपणासी होय दुःख । तें परासी न करी निःशेख ।
जेणें आपणियां होय सुख । तें करी आवश्यक प्राणिमात्रा ॥ १४ ॥
( १०० ) आंतरशुद्धीचें कारण । मुख्यत्वें हरिकीर्तन ।
नामापरतें साधन । सर्वथा आन असेना ॥ १५ ॥